प्रकाशक :
वा. रा. पेंडसे,
आपटे मंडळी, टिळक चौक, पुणें २.

मुद्रक :
अ. दे. इनामदार,
श्रीशारदा मुद्रणालय, पुणें २



## आज मिळणारीं पुस्तकें

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | सुगरिणीचा संसार | ३॥ | १० | रजपुतांचा भीष्म | ६॥ |
| २ | संसारांत पडण्यापूर्वी | २॥ | ११ | अजिंक्य तारा | ४॥ |
| ३ | गृहसौख्य | ३ | १२ | आम्ही दोघं | १॥ |
| ४ | उमज पडेल तर | २ | १३ | कर्मगती | ३ |
| ५ | त्या अबला होत्या | ४ | १४ | रामराज्य | २॥ |
| ६ | एकटी | ५ | १५ | न पटणारी गोष्ट | ४ |
| ७ | अपेक्षा | ४ | १६ | ५ ते ५ | २ |
| ८ | संगदोष | ४ | १७ | समर्थशिष्य | २ |
| ९ | अजरामर | २॥ | १८ | मी वाट पाहीन | १॥ |

# थोडें प्रास्ताविक

नदी नाल्यांना वळवाच्या पावसामुळे फार मोठे पूर येतात; पण ते चिरस्थायी नसतात. झपाट्याने येतात व तितक्याच गतीने नाहीसे होतात. नुसते जात नाहीत. बरोबर जुनें पाणीहि खरडून नेतात. यामुळे पात्रांत असलेलें एवढें तेवढें पाणी नाहींसें होतें व पाण्याची दुष्काळ आणखी वाढतो. माणसे जनावरें आणखी त्रस्त होतात.

अगदी हा प्रकार हिंदुस्थानाला मिळालेल्या स्वातंत्र्याचा झाला आहे! — स्वातंत्र्याचा लोंढा अकस्मात् आला आणि आमचीं साधीं साधीं सुखेंहि घेऊन गेला! निर्वाहापुरतें अन्न वस्त्र मिळेनासें झालें असून समाजांतील मधल्या वर्गाला तर **जगायचे कसें**? ही दारुण चिंता लागली आहे. याचा शेवट कुठे वा कसा? हें चांगल्या शहाण्या लोकांना आज वळत नाही मग सामान्य माणसाची गोष्ट ती काय?

हें दुर्दैव भोवतें आहे सर्वांना. पण यांत पुरी दामटी वळली आहे मधल्या वर्गाची! — हा मधला — म्हणजे पांढरपेशा — वर्ग केवळ ब्राह्मणांत आहे असें नाहीं. सर्व जातीपातीचे लोक या पातळीवर आहेत. सर्वांचे हाल एकाच धर्तीचे आहेत. रोगांचीं नांवें अनेक पण होणाऱ्या शरीर यातना एक तसा प्रकार आहे.

या मधल्या वर्गाची दुर्दशा इतकी पराकोटीला पोचली आहे कीं, तो बहुशः नामशेष होणार असेंच भविष्य सर्वांच्या तोंडी ऐकूं येतें. कालपुरुषाच्या डायरींत कोणती नोंद असेल, काय जाणावें? — एवढें निश्चित. मधल्या वर्गाने आपलें अस्तित्व टिकविण्याकरितां झगडलें पाहिजे. प्राप्त परिस्थितीच्या आहारीं जाण्यांत अर्थ नाही. जगायचें तर मानाने जगायचें असें धरून चाललें पाहिजे. कारण न जाणो. काळाला कलाटणी मिळेल व भविष्यकाळ चांगलाहि असेल, कोणी सांगावें?

जगण्यासारखा असेल तो जगेल; हा सृष्टीचा नियम असला तरी स्वपराक्रमानें व शहाणपणानें जगण्याचा हक्क कोणी कोणाचा काढून घेऊं शकत नाही. मधल्या वर्गातील सुजाण स्त्रीपुरुषांनी ही गोष्ट ध्यानीं घेऊन **कुटुंबशः काय करतां येईल?** याचा विचार करण्यास हरकत कोणती? — माझ्या वाङ्मयाचा मुख्य भर यावर आहे.

याकरितां सर्व साधारण स्त्रीपुरुषांच्या आंवाक्यांत बसेल अस **संसारकथा** * या सदराखालीं एक भाग मी कल्पिला आहे. तो मनोरंजक आहेच पण बोधकहि आहे. वाचकांना तो आवडल्याचें स्पष्ट दिसतें.

सर्व सामान्य माणसांच्या संसारांत आढळणाऱ्या गोष्टी ध्यावयाच्या व त्यांच्यापुरतें तें संसारचित्र कसें आहे व कसें असावें, हें दाखवावयाचें. पाताळांत जायचें नाही. गरुड भरारी मारायची नाही. कोणालाहि सहज पटावें असें वर्णन. कोठेहि सहज आढळतील असे देखावे. यामुळे वाचकांची करमणूक होते. त्यांना विचार जागृतिहि येते.

**जाऊबाई** ही आज वाचकांपुढे येत असलेली संसारकथा यांपैकीच आहे. नांवावरून हें ध्यानांत येण्यासारखे आहे की, या कथेंत किमान दोन जावा असाव्या. वस्तुस्थिति तशीच आहे. एका तरुण मुलीने आपलें व आपल्या वडील जावेचें चरित्र थोडक्यांत दाखविलें आहे. कथा वाचकांपुढे आहेच. विशेष वर्णन करीत नाहीं. पण यांत रंगविलेले कांही प्रसंग स्वतःचे वाटेतील किंवा जवळ कुठेतरी पाहिल्याचे ध्यानीं येईल. तरुण मुलींना आत्मपरीक्षण करण्यास त्यांचा उपयोग व्हावा.

ही संसारकथा लिहिण्यांत मुख्य हेतु आणखी थोडा वेगळा आहे. तो कुटुंबसंस्थेच्या बळकटीशीं व हिताहिताशीं निगडीत आहे. संसारी स्त्रियांनी ही गोष्ट लक्षांत घेण्यास हवी.

---

* १ – आम्ही दोघं. २ – मी वाट पाहीन. ३ – पुरुषाचें भाग्य. ४ – सोन्याचे बिलवर. ५ – उमज पडेल तर. इत्यादि संसारकथा पाहा.

सध्या जीवनकलहाची तीव्रता भयंकरच वाढली आहे. इतकी कीं, संसाराचे मुख्य घटक जे पतिपत्नी त्यांनासुद्धा एकत्र राहण्यास सांपडते कीं नाही, अशी विवंचना निर्माण झालेली आहे. मग चार माणसांचें कुटुंब एकत्र येणें लांबची गोष्ट.

एकत्र कुटुंबपद्धतीला हा जो धक्का बसला आहे, तो अत्यंत शोचनीय आहे यांत शंका नाही. पण समाजाच्या बळकटीच्या दृष्टीने व व्यक्तीच्या हिताकरितां या घसरगुंडीला कांही आळा घालणें किंवा निराळें स्वरूप देणें अगत्याचें आहे. जाऊबाईमध्ये त्या विचारांची पेरणी आहे. नवे राजकीय तत्त्वज्ञान सांगतें: मरेना ती कुटुंबसंस्था यापुढे तिची आवश्यकता उरलेली नाही! — मला वाटतें, हें नवें शहाणपण आपण हिंदूंनी थोडें बेताने हाताळावें. आपला पिंड वेगळा आहे आणि या नव्या तत्त्वज्ञानाचा अद्याप कस लागायचा आहे. आम्ही सावध राहिलेलें बरें. मोठीं कुटुंबें एकत्र नांदण्याचा काल संपलेला आहे यांत शंका नाही. पण परस्परांना पूरक होणारे व परस्परांच्या साह्याने निर्वेध चालणारे असे आटोपशीर संसार आजहि एकत्र चालावे. आर्थिकदृष्ट्या अशा एकोप्याची अत्यंत आवश्यकता आहे. युरोप अमेरिकेंत अशीं कितीतरी कुलें व कुटुंबें आहेत कीं जी आर्थिक बलाने एक आहेत. या सर्वांचा व्यवसाय एकत्र. धनोपार्जनहि एकत्र. या बाबतींत एका कर्त्या गृहिणीचे उद्‌गार आहेत की, कुटुंबांतील एकूण एक मनुष्य उद्योगी – परिश्रमी – मिळवते पाहिजे. कलहाचा प्रसंग उद्‌भवण्याचें कारणच नाही.

कुटुंबांतील सासवासुनांचें युग आतां संपलें आहे म्हणण्यास हरकत नाही. पण बरोबरीच्या जावाजावांनी – मुद्दाम नव्हे पण सहजासहजी एकत्र राहण्याचा प्रसंग आल्यास सोय व काटकसर होण्याकरितां दूर दूर होण्याचें टाळावें. आज मधल्या वर्गाचें अर्थोपार्जन अगदी सामान्य झालें आहे. त्यांत महर्गता व दुर्मिळता. थोडा विवेक केल्यास एकत्र नांदणूक व्हावी. निदान **जाऊबाईंत** दाखविलेल्या **पांच कुटुंबांचें संस्थान** या

देखाव्याप्रमाणें. या पद्धतीने एकत्र येणें कांही अगदीच अशक्य नाही. जाणत्या स्त्री पुरुषांनी विचार केला पाहिजे.

सध्या आपला समाज एका नव्या स्थित्यंतरांतून जात आहे. नव्या स्वरूपांत त्याची धारणा होत आहे. या घडामोडींत कांही जुनी रचना मोडणार व मूल्येंहि बदलणार यांत शंका नाही. पण या क्रांतीच्या बुडाशीं एक शाश्वत सत्य लपलेलें आहे. तें नाहीसें होतां उपयोगी नाही. विकृतहि होतां उपयोगी नाही.

हें शाश्वत सत्य म्हणजे राष्ट्राचें ऐक्य व परस्पर सद्भाव होय. हा पाया टिकेल तरच समाज किंवा राष्ट्र जिवंत राहील. संकटांतून निभावून जाईल. पुन्हां वैभवास चढेल.

आम्हांला हें साधावयाचें असल्यास कुटुंबांतील ऐक्यावर भर देणें भाग आहे. पोटाच्या पाठीमागें लागून परागंदा होणाऱ्या व्यक्तींचें प्रमाण वाढत्या प्रमाणावर आहे. पण उद्यां यांत्रिक युगाच्या या परिणामाला आळा घालण्याची आवश्यकता निर्माण होईल व त्यावेळीं नगरांच्या वाढी थांबवून खेडी पुनरुज्जीवित करण्याची पाळी येईल. पुनश्च नव्या धर्तीची कुटुंब रचना अनुसरावी लागेल, कोणी सांगावें. त्याकालीं कुटुंबाचे धागे हुडकीत बसण्यापेक्षां आज त्यांची जोपासना करणें दूर दृष्टीचें होईल. पुढील पिढ्यांचें कल्याणहि आपण साधूं.

**जाऊबाई** कथानकांत याच साध्या विचारांचे पडसाद आहेत. पुस्तकाचा जीव लहान आहे. तें जीवनाचीं महान् तत्त्वें सांगण्यास असमर्थ आहे. वाचकांनी पुढे ठेविलें आहे त्याचा स्वीकार करावा. कांही उपयुक्तता पटल्यास ग्रहण करावी

कोरेगांव श्रा. व–३.७२ }
३०-८-५०

कृपाकांक्षी,
**नारायण हरि आपटे.**

# श्रद्धाञ्जली

*

माझे ज्येष्ठ बन्धु
ती. कै. ग. ह. आपटे यांच्या पत्नी

ती. रमाबाई आपटे,
यांना —

रमा वहिनी,

आपणां दोघींची जमा आतां म्हाताऱ्यांत आहे, अशा वेळीं हें पुस्त
तुझ्या चरणीं अर्पण करण्यांत मला एक विशेष आनंद वाटतो. कां ? —
तुला पाहिल्यावर, तुझ्याशीं गप्पा मारीत बसल्यावर व तुला अद्यापी खाल
वाकून प्रणाम करितांना मी अद्याप पंचावन्न वर्षांपूर्वीचा चिमुकला नान
भाऊजी आहे असें मला वाटतें. माझ्या बंधूच्यापेक्षा तूं माझ्यावर जास्त प्रे
केलेस, जीवनाविषयीं जास्त शिकवलेस असा माझा विश्वास आहे. म
लेखक होण्यांत तुझ्या वात्सल्याचा हात जास्त आहे, असें म्हटल्यास त
अतिशयोक्ती नाही. तुला एकवार मनोभावें प्रणाम करून हें पुस्तक तुझ्य
हातांत देतों.

## प्रकरणांची सांखळी

*


१ सौ० पदवीचा वेध लागला !

२ वधु-वर-संमेलन !

३ जाऊबाईंचं हितगूज

४ साकोरकरबाई व एक वन्सं

५ मधला दीड वर्षाचा काल

६ ऐका देवा घड्याळाची कहाणी

७ माझे दोन मुखवटे

८ जीवनाचं हें स्वरूप खरं

९ शेवटीं शहाणपण उतूं गेलं !

१० अवदसा आंगणांत आली !

११ ढग पाण्याचा. वर्षाव अग्नीचा !

१२ मागील नाटकाचं भरतवाक्य

१३ घरच्या वकिलाचं साह्य

१४ पांच कुटुंबांचं संस्थान

१५ रक्त आणि अश्रू !

१६ प्रेमळ पत्राचा आघात !

१७ काळी काळी रात्र. नंतर सकाळ

— १ —

## सौ. पदवीचा वेध लागला !

चवदा पंधरा वर्षांची असेन मी. एके दिवशी आईला कळलं कीं, आपली कुमुद वयांत आली. आतां तिला स्थळं पाहण्यास सुरुवात केली पाहिजे. त्याप्रमाणं तिनं आपला विचार वडिलांच्याजवळ बोलून दाखविला.

मी लज्जेनं चूर झाल्यामुळं बाजूबाजूलाच होतें.

बाबांनी मला हाक मारली व हसत म्हटलं, "कुमे, तुझ्या आईनं आमच्या-वर नोटीस बजावल्याचं ऐकलंस ना ? — बस्स् ! उद्यापासून त्या कामाला लागणार. यंदाच्या लग्नाचा मोसम वाया जाऊं द्यायचा नाही. आमच्या सौभाग्यकांक्षिणी कुमुदताईंना कुणाच्या तरी गळ्यांत अडकवून द्यायची. काय समजलं ! " ते मनापासून हसले.

ही सारी थट्टा आहे हें मी जाणलं. तरीपण मी रुसत फुगत आपला निषेध प्रगट केला. माझं शिक्षण पुरं झाल्यावाचून कांही करायचं नाही, अशी प्रतिज्ञा मी बोलून दाखविली.

पुढं तो विषय तितकाच राहिला.

पण काल थांबला नव्हता. मी आठरावं वर्ष व मॅट्रिकचा उंबरठा ओलांडून पुढं गेलें. आता माझ्या विवाहाचा प्रश्न केवळ थट्टेचा राहिला

नव्हता. आईची निकड व बाबांची चिन्ता वाढली होती. माझी शिक्षण पूर्ण करण्याची सबब तितक्या प्रमाणांत दुर्बल होत चालली होती. बरोबरीच्या एक दोन मैत्रिणी सौ. पदवी पटकावून मोकळ्या झाल्या होत्या !

या सुमारास मुलींनाहि नोकऱ्या मिळण्याचं पेव फुटलं होतं. यांतहि माझ्या पांच सहा मैत्रिणी घुसल्या होत्या. मिळवत्या झाल्या होत्या. मॅट्रिक झालेल्या एवढ्याशा चिमुरड्या पोरीला महिन्याचा तनखा शंभर — सवाशें — दीडशें ! — किती मोहक मृगजळ होतं तें.

बाबांची इच्छा नव्हती. पण आईला कौतुक होतं. मी पांच सहा महिने गेलें त्या मार्गानं. पण मनाला बरं वाटेना. निरनिराळ्या वृत्तीच्या तरुणांशी येणारा संबंध, प्रौढ वयाच्या अधिकाऱ्यांचे चाळे, भोवतालच्या जगाच्या चेष्टा कुचेष्टा आणि मनाला भुरळ पाडणारे प्रसंग; यांची अशी कांही गर्दी झाली कीं, कितीहि सावधान राहिलं तरी त्यांतून सरळपणें आयुष्य कंठणं कठीण वाटूं लागलं. अशा मिळवत्या मुलींविषयी लोकप्रवादहि उठूं लागले. आईवडिलांच्या कानीं या कागाळ्या आल्या. दोघंहि भयभीत झालीं, चिंतेंत पडलीं, रागराग करूं लागलीं. मला मिळणाऱ्या वेतनाचा मोह त्यांनाहि होता. पण आगीशीं फुगडी खेळण्यांत अर्थ काय ? — मी नोकरी सोडली व कॉलेजांत जाऊं लागलें. महर्गतेनं, युद्धाच्या ज्वालांनी नी आवश्यक वस्तूंच्या दुर्मिळतेनं मधला वर्ग भरडून निघत होता. आमचं कुटुंब त्यापैकीं एक होतं. यांत आईवडिलांना माझ्या विवाहाची काळजी होती !

अशा जीवनांत वाट चालत असतां बाबा म्हणाले, " कुमे, नवऱ्या मुलासंबंधीं रेशन आहे बरं का ! त्याचाहि क्यू लागलेला आहे. त्यांत जागा धरून ऐस नी पुढं सरण्याचा प्रयत्न कर. आम्ही आहोंतच. तूंहि लक्ष ठेवलं पाहिजेस. कॉलेजांत जाते आहेस. कुठं संधान लागून सौ. पदवी मिळते का पाहा. पण सावध अं. आपल्यासारख्यांनी या बाबतींतहि ब्लॅक मार्केट करायचा नाही. रेशन मिळवायचं.—काय समजलं ? "

बाबांच्या या बोलण्यांत काय नव्हतं ? चिंता, उद्वेग विनोद नी हताश मन ; सर्व कांही होतं.

इंटर झालें. बाविसाव्या वर्षात आलें. सौभाग्यकांक्षिणी मुलींच्या क्यूमध्यें मी होतेंच. पण नवरा मिळण्याचं रेशन दुकान अद्याप किती अंतरावर आहे ?—कळणं कठीण होतं. मात्र या कालांत दाम्पत्यजीवन म्हणजे काय ? पतिदेव कसे असावेत वा नसावेत ? पत्नीधर्मांचे नियम काय आहेत ?— संसार कसा करायचा ? यांचे विचार मनांत येत होते. इतरांचे समजत होते. साहित्य व चित्रपट पाहून कांही मानसिक आंदोलन सुरू होतं. पण कोण- त्याहि कादंबरींत वा लघुकथेंत वर्णन केल्याप्रमाणं मी नायिका होण्याचा योग जुळून आला नव्हता. माझे Prince Charming हि मला आढ- ळले नव्हते.

कदाचित् असं असेल. मी श्रीमंताची लेक नव्हतें एकदम अप्सराहि नव्हतें. धीट होतें पण ढालगज नव्हतें. बोलकी होतें पण वाचाळ नव्हतें. ध्येय जाणून होतें पण आकाशाला गवसणी घालणं मला साधण्यासारखं नव्हतं. अर्थात् उणं काय पडत होतं, काय सांगावं ? सौ. च्या पदवीचा वेध लागलेला. पण त्याचं प्रमाणपत्र दृष्टिपथांत नव्हतं. मनाला चुकल्या- चुकल्यासारखं वाटत होतं, एवढं खरं.

आणि अशा अवस्थेंत विचाराला एक नवा धक्का मिळावा म्हणूनच कीं काय कोण जाणे ?—खालील संवाद ऐकण्यास मिळाला.

बोलणाऱ्या तरुणी दोन. एक विवाहित. दुसरी अविवाहित. सौभाग्य कांक्षिणीच्या क्यूमध्ये असलेली.

**सौ. कां.** उल्हासांत म्हणाली, “ मी माझ्या संसाराचा फुलबाग असा फुलविणार आहें, ज्याचं नांव तें.”

**सौ. पदवी विभूषिता** हसली व म्हणाली, “ म्हणजे नवरा बायकोंत गाढ प्रेम राहील असं वागणार ? ”

**सौ. कां.** " अर्थात्. तो तर संसाराचा गाभा. "

**सौ. प. वि.** " अगदी खरं. पण संसाराचा फुलबाग केवळ पतिपत्नीचं प्रेम नव्हे. तो एक स्वतंत्र वाफा आहे इतकंच. "

**सौ. कां.** ( गोंधळून ) " लक्षांत नाही येत. "

**सौ. प. वि.** " सासरच्या माणसांचा परिवार लक्षांत घ्यायला हवा. सासूबाई, जाऊबाई, नणदा, दीर, चुलत घरचीं माणसं— "

**सौ. कां.** " पण असे ऐस पैस संसार आता राहिले आहेत कुठं ?—नगरा-नगरांतून कबुतराच्या जोड्याच दिसायला लागल्या आहेत ! पोटाला मिळविण्याचा मार्ग म्हणजे केवळ नोकरी. ती कुठं मिळेल काय सांगावं ? "

**सौ. प. वि.** " हा नियम झाला. पण त्याला अपवाद आहेत. कुठं सासू आहे, कुठं नणंद आहे, कुठं जाऊ आहे !—नवऱ्याच्या मनांत असलं तरी त्याला पुष्कळदां हीं नातीं टाळतां येत नाहीत. जबाबदारी दूर सारतां येत नाही. "

**सौ. कां.** " पण परिस्थितीप्रमाणं आडवं आलेलं कापून काढायला नको का ?—निदान डोळ्यावर कातडं ओढून बाजूला सरायला नको का ? "

**सौ. प. वि.** " हा झाला परघरांतून आलेल्या पत्नीचा विचार. पण पुरुषाला जर असा परिवार असला व तो त्याला तोडतां आला नाही तर ?—किंवा त्याला तो प्रिय असला तर ? "

सौ. कां. निरुत्तर झाली.

**सौ. प. वि.** हसत पुढं म्हणाली, " केवळ पतिपत्नीचा संसार हा फुलबाग होणं कठीण आहे—एकदोन झाडंच असलेल्या माळाला फुलबाग म्हणाल का ? – नाही. म्हणून संसाराचा फुलबाग सासरच्या परिवारावर अवलंबून आहे. असा परिवार नसणं ही मोठी उणीव. तो असून नाकारणं हा मोठा दोष. "

**सौ. कां.** " पण माणसं चांगलीं असलीं तर ? "

**सौ. प. वि.** " आधी आपण चांगलं असलं पाहिजे. फुलबाग सुंदर फुलविण्याची जबाबदारी आपल्यावर आहे—"

*  *  *

मग मधेंच एक नोकरीचा वृक्ष आढळला.

' **शारदा विद्यालय** ' ही एका सोसायटीतर्फे चाललेली मोठी इंग्रजी शाळा. या विद्यामंदिरांत शिक्षकांची उणीव तीव्रतेनं भासत होती. बाबांची व शालाचालकांची दाट ओळख. मी घरींच रिकामी आहें, हें कळतांच नोकरी चालून आली. वेतन शंभराच्या पुढं मिळणार होतं. शाळेचा लौकिक चांगला होता.

सौ. होईपर्यंत ' **बाई** ' ही चालून आलेली पदवी कां नाकारा ?— सर्वानुमतें ठरलं ! शिक्षिकेचं कार्य मला आवडण्यासारखं होतं. वातावरणहि भावण्यासारखं होतं. मी मान्यता दिली व शाळेंत जाऊं लागलें.

शारदा विद्यालयांत माझ्याशिवाय आणखी तीन शिक्षिका होत्या. एक बी. ए. बी. टी., दुसरी, मॅट्रिक एस्.टी.सी., तिसरी, मराठी ट्रेन्ड ! तिघींहि वयानं माझ्यापेक्षा पोक्त होत्या, अविवाहित होत्या. यामुळं म्हणा किंवा अन्य कारणामुळं म्हणा तिघींच्या स्वभावांत व आचारविचारांत मोठं वैचित्र्य होतं. पण त्यांच्या जीवनाचा संबंध माझ्या जीवनाशीं — पण जाऊं दे. ओघाओघानं पाहूं. असो.

कोणाकडेहि लक्ष न देतां पुढं पुढं जाणारा काल जगानं मोजला. आठवडा, महिना, दोन महिने, सहा महिने, वर्ष. शिक्षिका म्हणून मीं चांगला लौकिक मिळविला. माझ्याकडे इयत्ता तिसरीची ब तुकडी देण्यांत आली होती. मुलं तीस. त्यांत आठ मुली होत्या. सर्वच मुलं आपल्या बाईंवर खूष होतीं. तिच्या आज्ञेतहि होतीं. मोठं यश होतं तें. मिळवती लेक म्हणून मी आईवडिलांना आणखी प्रिय झालेंच होतें. पण माझा लौकिक ऐकून त्यांना

आणखी धन्यता वाटली. अर्थात् या आनंदांत मी सौ. कां. च्या कयूंत असल्याचं कांहीसं विसरलें. बी. ए. बी. टी व्हायचं. तें न जमलं एस्. टी. सी. व्हायचं किंवा टी. डी.चा प्रयत्न करायचा. पण आईला माझ्या विवाहाचा विसर पडलेला नव्हता. मी तेवीस वर्षांची झालें, हें तिला बोचत होतं. आतां उशीर होणं म्हणजे प्रौ. कु. चं रिडक्शन पत्करण्यासारखं होतं. ही गोष्ट माझ्या कुटुंबांत कोणालाच "आनंदकारक" नव्हती. मधून मधून मीहि खिन्न होत होतें. मी स्वतःची समजूत करीत होतें. शाळेंत तिघीजणी माझ्या सहकारी शिक्षिका आहेत. त्यांच्यांत मी आणखी एक. काय बिघडलं?

पण जीवनाचं हें कांहीं खरं उत्तर नव्हतं.

आणि एके दिवशीं—

बाबा, आई, मी शाळेसंबंधीं कांहीं बोलत होतों. मी एस्. टी. सी. व्हावं असं शाळेच्या मुख्याध्यापकांनी बाबांना सुचवलं होतं. सर्वांचं साह्य व उत्तेजन मिळणं सहज शक्य होतं.

मध्येंच बाबांनी विचारलं "काय ग कुमूदताई, तुमच्या शाळेंत म्हणे कोणी राजाभाऊ रायकर नांवाचे एक तरुण शिक्षक आले आहेत. पाहण्यांत आले तुझ्या?"

"राजाभाऊ रायकर?—" मी आश्चर्यानं म्हटलं, "अं—हं— माझ्या वर्गांत श्यामा रायकर नांवाची एक मुलगी मात्र या वर्षी आहे. नुक्तीच खालच्या इयत्तेतून आली—"

आई मध्येच म्हणाली, "हे राजाभाऊ तिचे कोणी आप्त असतील. शोध घे पाहिजे तर. बी. ए. आहेत म्हणे. सध्या एल्. एल्. बी.चा अभ्यास करताहेत. वकिली करण्याचा त्यांचा विचार आहे म्हणतात."

मी एकदम चपापलें. गप्प बसलें. त्यांच्या पुढून उठून गेलें. मी कांही अगदीच नवोढा किंवा लाजरी नव्हे. तरी पण मला हा नवा धक्का चांगला जाणवला. फार वेळ झोपाळ्यावर बसल्यानंतर जसं घेरल्याघेरल्याप्रमाणं

होतं, तसं मला होऊं लागलं. चित्त व्याकुळ झालं. अन् शरीर गळून गेलं. मुकाट बाजूला गेलें. डोळे मिटून पडलें.

सौ. पदवीच्या वेधानं नवी उचल खाल्ली होती. या संबंधांत माझा नकार किंवा विरोध मुळींच नव्हता. एवढंच वाटत होतं : ही बाब इतकी चिंतेची वा कष्टाची कां असावी ?

त्या रात्रीं माझी निद्रा व स्वप्नसृष्टि कशी असेल ? याचं वर्णन मी करीत नाहीं. सारखं कांहींतरी दुखल्याखुपल्याप्रमाणं वाटत होतं. मनांतील आंदोलन मोठं विचित्र होतं. एकदां वाटत होतं : रायकरांचं स्थळ चांगलं असावं. चटकन् जुळून जावं. पुन्हा वाटत होतं : घाईनं कांही करायचं नाही. जन्माच्या सुखदुःखाचा विषय. सावध राहिलं पाहिजे.

या द्विधा अवस्थेंत तो ऐकलेला संवाद आठवला. रायकरांची गृहस्थिति कशी असेल ? त्यांचा परिवार किती असेल ? कुटुंब लहान असेल कीं मोठं असेल ? — मनांत प्रश्न आले व विरघळून गेले. दुसऱ्या दिवशीं शाळेंत कामावरसुद्धा जाऊं नये असं वाटलं. पण तसं कांही केलं तर ? तें हास्यास्पद दिसेल. शिवाय तोंड कां चुकवायचं ? नी कुणाकरितां चुकवायचं ? असंहि मनांत आलं. प्रसंगाला धीटपणानं तोंड देणं उचित. ठरवून टाकलं. स्वतःला चांगला धीर दिला. पोक्तपणानं साधक बाधक विचार मलाच केला पाहिजे असंहि मनाला बजावलं.

दुसऱ्या दिवशीं नित्यक्रमाप्रमाणं शाळेंत गेलें. धीटपणानं. हसत मुखानं. घंटा होण्यास दहा मिनिटं अवकाश होता. शाळा गजबजूं लागली होती. आमच्या लेडीज रूमच्या पुढील वरांड्यांत साकीकरबाई (बी. ए. बी. टी.) रेंगाळत होत्या. मोठ्या गंभीर अबोल बाई. मुद्रा थोडी त्रस्तपैकीं. आमच्याशीं त्या क्वचितच बोलत. तरीपण पदवीधर वरच्या वर्गावरील शिक्षिका. मानास्पद होत्या.

आमचा नमस्ते घडला. दोघीहि पुढच्या कठड्याला टेकलों. औपचारिक

बोल्लों. त्यांत कसं कोण जाणे, माझ्या तोंडून पुढील प्रश्न बाहेर पडला : "आपल्या शाळेंत राजाभाऊ रायकर नांवाचे कोणी नवे शिक्षक आले आहेत ?"

विलक्षण आश्चर्य ! साक्रीकरबाई चपापल्या. त्यांच्या मुद्रेवर तुच्छता उमटली. त्यांनी भोंवतालीं पाहिलें. त्या माझ्याकडे सरकल्या व घोगऱ्या आवाजांत म्हणाल्या, "कां ? —कां ? — फार चौकशी करतां ? (ओंठ चावीत) हें — हें —तुम्हांला शोभण्यासारखं नाही अं ! —लेकीकरितां स्थळं पाहण्याची अक्कल तुमच्या वडिलांना नाही वाटतं ? — रास्कल ! — साफ सांगतें. पहिला क्लेम माझा आहे. मी तुझी डाळ शिजूं देणार नाहीं. पाहा पाहिजे तर — " असं दटाऊन ती बया झटक्यानं माझ्या पुढून निघून गेली !

— २ —.

## वधु - वर - संमेलन !

हा प्रकार पाहतांच मी क्षणभरच्च गांगरलें, भयचकित झालें. दुसऱ्या क्षणाला स्वतःशीं हसलें, म्हणालें—“ काय मनुष्य स्वभाव आहे ! या महामायेला एक झणझणीत पत्र लिहून कळवूं का राजाभाऊ रायकरांना घे गळ्यांत बांधून. तुझा क्लेम एकदम मंजूर.—ते तुला मान्य करतात का एवढं समजून घे आधी ! ”

घंटा झाली. वर्गांत जात असतां मी स्वतःला म्हटलं, “ पण तुला हें विकत श्राद्ध पाहिजे कशाला ?—आईवडिलांना रायकरांच्याबद्दल कांहींहि सांगतां येईल. नकारहि देतां येईल. त्याचं काय ? ”

माझा बेत असा होता. दैव आपला डाव निराळा योजीत होते. यानंतर दोन दिवसांनी रविवार आला व एक सहज प्रकार घडला. आज मजकडे मंडईतून भाजी आणण्याचं काम आलं. साडेसातलाच्च मी पिशव्या झुलवीत घराबाहेर पडलें. मार्गांत भेटली माझी नवीन विद्यार्थिनी श्यामा रायकर.

दृष्टादृष्ट होतांच दोघीहि हसलों. तिचा नमस्ते मीं स्वीकारला. “ मंडईत ? ” मी विचारलं. तिनं जवळून चालत रुकार भरला. दोघीहि बोलत चाललों.

सहजच मी विचारून गेलें : “ तुझ्या घरीं कोणकोण मंडळी आहेत ? ”

"आई वडील, आम्ही चार भावंडं, आमचे चुलते–" श्यामा पुढं म्हणाली, " आमच्या घरीं याल एकदा ?–याच मी सांगीन ताईला, आमच्या बाईंना बोलवूं या म्हणून– "

" ताई कोण ? "

" आमची आई. तिचं नांव आहे अंबूताई. पण सर्वजण तिला ताईच म्हणतात. आम्ही मग त्याच नांवानं हाक मारायला शिकलों. "

" वडील काय करतात ? "

श्यामा खेदमिश्रित स्वरांत म्हणाली, " ते पूर्वी शाळामास्तर होते. पण पांच वर्षांमागं त्यांना मोटार ॲक्सिडेंट झाला. कमरेखालचं त्यांचं अंग लुलं पडलं आहे. म्हणून ते घरींच असतात. पण आहेत मोठे उद्योगी. बसल्या बसल्या ते छापखान्यांतील प्रुफं तपासण्याचं काम करतात. संसार चालण्याइतपत मिळतं त्यांना– "

" चुलतींचं नांव काय ?–त्यांना मुलं बाळं– " अगदी साळसूदपणानं मीं विचारलं.

श्यामा खुदकन् हसली व म्हणाली, " आमच्या काकांचं अद्याप लग्न व्हायचंय्.–आपल्या शाळेंत ते शिक्षक म्हणून आले आहेत ना. ते पुढं वकील होणाराहेत–"

माझा संशय फिटला. श्यामेच्या चुलत्यांना अद्याप मी पाहिलं नव्हतं हें खरं. पण साक्रीकरबाईशीं त्यांचा विजोड असणार याविषयीं मला शंका राहिली नाही. पण मिया बिबि राजी तो क्या करेगा काजी ? ही म्हण मला आठवली. मनांत तें चित्र उभं राहिलं. त्या बाईचा तो आवेश—ती धसकी–तो मुद्राभिनय !–कठिण !—मला हसूं आलं, नी सहज समोर पाहिलं: साक्रीकरबाई समोरून येत होत्या. आम्हा दोघींकडे पाहत होत्या !

मी किंचित् थबकलें. श्यामा खालच्या सुरांत म्हणाली, " साक्रीकरबाई——"

मी—आम्ही दोघींनी—त्यांना नमस्ते केला. त्यांनी तो न स्वीकारता मान फिरवली. आमच्या अंगावरून त्या निघून गेल्या. श्यामा रायकरशीं संधान बांधून मी त्यांचा क्लेम धुडकावून लावण्याच्या प्रयत्नांत आहे, असं त्यांनी मानल्यास नवल तें काय ?

पण ही चुरस लागणार असं मला वाटूं लागलं.

दोन दिवसांनी त्याचं प्रत्यंतर आलं. आज आमच्या शाळेला कसली तरी सुट्टी होती. सकाळींच श्यामा आपल्या आईला घेऊन आमच्याकडे आली. आमच्या आईनं त्यांचं स्वागत केलं. त्या दोघांची थोडी ओळख असावी.

ताई—श्यामाची आई—परिचय होतांच ध्यानांत राहण्यासारखी व्यक्ति होती. वय तीस पस्तीस असावं. पण अंग अगदी सडसडीत. चार मुलांच्या त्या माता असतील असं कांही वाटत नव्हतं. मुद्रा मानी होती. पण वाणी आर्जवी होती. वर्ण निमगोरा पण आरोग्य छान असल्यामुळं त्या सुंदर वाटत होत्या. छातीचा भाग डौलदार होता तर एकंदर वागण्याची ढब कांहीशीं ऐटीची होती.

सुमारें पंधरा मिनिटं त्या बसल्या. आईशी त्या बोलत होत्या. पण माझ्याकडे पाहत होत्या. मी चहा करीत त्यांच्यापुढं जाऊन येऊन होतें. चहा घेण्यास बसल्यावर मग त्या माझ्याशीं चार शब्द बोलल्या—श्यामाच्या अभ्यासाबद्दल व शाळेबद्दल.

नंतर त्यांनी आईला व मला संध्याकाळीं चारला बसण्यास या म्हणून आमंत्रण दिलं. आईनं तें स्वीकारलं. ताई मुलीसह निघून गेल्या.

माझ्या मनाला उगीचच हुरहूर लागली.

आई मधेच एकदा बोलून गेली, " ताई तुला आपली धाकटी जाऊ करून घेणार बरं का ? "

मी मनांत म्हटलं, " पण आम्ही दोघांनी एकमेकाला पाहायला व पाहून

पसंत करायला नको का ? ”

पण परिस्थिति सांगत होती. तें जमण्यासारखं आहे.–आणि त्रांतच मला मधून मधून सात्रीकरबाईंचं स्मरण होत होतं. त्यांच्या धमकीचं नवल वाटत होतं. आज सायंकाळीं काय ठरणार ?––हा प्रश्न मधेच डोकावत होता.

चार वाजतां आम्ही मायलेकी रायकरांचेकडे जाण्यास निघालों. तोंच श्यामा आम्हाला बोलवायला म्हणून आली.

“ तूं कशाला हेलपाटा घेतलास ?––आम्ही निघालोंच होतों. ” असं आईनं बोलून तिनं श्यामेचं कौतुक केलं. ताईंच्या व्यवहार चातुर्याची तारीफहि केली. मी किंचित् हसत टीप दिली, “ बाकी श्यामा आली हें बरं झालं. आपल्याला घर शोधीत बसायला नको. ”

श्यामा बारा तेरा वर्षांची मुलगी. पण चुणचुणीत होती. वयांत येत चालली होती. माझी टीप ऐकून ती ऐटींत म्हणाली, “तुम्हांला तसा त्रास पडला नसता. आमच्या आळींत आल्यावर आमचा रायकरांचा वाडा तुम्हांला कोणीहि दाखविला असता–– ”

ही वार्ता आईलासुद्धा नवनि होती. तिनं नवलानं विचारलं, “ तुमचा स्वतःचा वाडा आहे इथं ? ” नंतर तिनं मजकडे पाहिलं. त्या दृष्टींत असा भाव होता का ?––“ काय पोर भाग्याची ! मुलगा बी. ए. उद्या वकील होणार. राहायला सत्तेचा वाडा. वाड्यांत कांही बिऱ्हाडंहि असतील. थोडंफार भाड्याचं उत्पन्न येत असेल–आणि घर आहे त्या अर्थी शेतवाडी असणारच––”

पण दुसऱ्याच क्षणाला श्यामा म्हणाली, “ नांव मोठं नी दर्शन खोटं असा आमचा वाडा आहे. सगळीकडे पडलेला.–खरं म्हणजे ती एक मोठी बखळ आहे––” ती मजकडे पाहत हसली. मीहि हसलें. थोड्या वेळानं आम्ही बाहेर पडलों.

श्यामा व आई कांही बोलत चालल्या. मी त्यांना समान्तर पण मुकाट

ालले. त्यांच्या संवादांत भाग घेण्याइतपत माझं मन स्वस्थ नव्हतं. नुस्तं
हूं करून किंवा मान डोलवून मी निभावत होतें. धीटपणें वागायचं,
गीच विमनस्क असायचं नाही किंवा गोंधळून जायचं नाही असं मी
तःला खूप बजावलं होतं. पण त्याचा विशेष उपयोग झाला नाही. वधु
हणून परीक्षा देणं नी वराचं संशोधन सावधपणानं करणं या दोन्ही गोष्टी
संग उद्भवतांच जड वाटूं लागल्या. आंतून मी गांगरून गेलें.

"काय बोलावं लागेल? काय सांगावं लागेल?—वरासंबंधीं काय
ाहावं लागेल? स्वतःची पसंती वा नापसंती कशी दर्शवितां येईल?—असे
क ना दोन कितीतरी विचार मनांत आले. परिस्थितीप्रमाणं काय ठरेल तें
रेल असंहि स्वतःला सांगून सुस्कारा टाकला. तरी मनाची विचलता संपली
ाही.

सुमारे दहा बारा मिनिटांत आम्ही रायकरांच्या वाड्यांत येऊन पोंचलों;
ी अंतर्मुख असल्यामुळं समोरच्या गोष्टी धडपणें निरखतां आल्या नाहीत.
ाड्याच्या दरवाजाच्या बाहेरच्या बाजूस दोन चार दुकानं दिसलीं. आंत
वेश केल्यावर श्यामाचं सांगणं प्रत्ययाला आलं. बखळच होती ती!—केवढं
री आवार पसरलेलं आढळलं. बाजूला एक घर दिसलं. तें डौलदार नव्हतं
ोठंहि नव्हतं. पूर्व पश्चिम असा पांच खणी भाग नवा वाटत होता. त्याच्या-
र माडी होती. याच्या काटकोनांत उत्तर दक्षिण असा जुना भाग होता.
ाच्याच अंगणांत ताई आमची वाट पाहत उभ्या होत्या. श्यामा धावत पुढं
ली. ताई चार पावलं आमच्याकडे आल्या व आम्हाला घेऊन आंत गेल्या.

आंत गेल्यावर मात्र घर प्रशस्त, स्वच्छ व टापटिपीचं वाटलं. शिरलों त्या
ागांत खालीं पडवी व वर सोपा असा भाग होता व इथं एक चांगल्यापैकी
ोपाळा टांगला होता. ताईंनी आम्हा मायलेकींना झोपाळ्यावर बसण्यास
ांगितलं. आम्ही टेकलों.

ताई म्हणाल्या, "याला लागून सामानाची खोली, तिच्या पलीकडे

सैपाकघर न्हाणीघर अशी व्यवस्था आहे. इकडे हा नवा भाग. यांत श्यामाचे वडील बसतात. वरच्या माडींत भाऊजींचा वापर आहे. "

इतक्यांत चवदा पंधरा वर्षांचा एक मुलगा नव्या भागांतून दार उघडून आला. आम्हाला पाहून किंचित् संकोचला. ताई म्हणाल्या, "हा माझा थोरला मुलगा. माधव–( त्यास उद्देशून ) त्यांना नमस्कार कर, बाळ—"

त्यानं आमच्यापुढं येऊन खालीं वाकून आम्हां दोघींना नमस्कार केला. नंतर तो आपल्या आईला म्हणाला, "सारी मांडामांड झालीय् आंत."

ताईंनी मान डोलावली व मुलाला म्हटलं, "तूं नी श्यामा तेवढं चहाचं आणतां का?–जपून आणा अं. मी यांना नेतें आंत.––" बाळ ऊर्फ माधव आमच्याकडे कौतुकानं पाहत सैपाकघराकडे गेला. श्यामा आधीच तिकडे गेली होती.

ताई आम्हाला म्हणाल्या, "शामाचे वडील कांहीसे पंगू आहेत. तेव्हा सगळ्यांनी तिथंच बसून चहा घ्यायचं ठरवलंय्. चालेल ना? —" आईनं मान्यता दिली. दोघी माझ्याकडे पाहून हसल्या.

ताई पुढं झाल्या. आई मला घेउन त्यांच्या मागं गेली. माझा संकोच व छातीची धडधड वाढली.

आम्ही प्रवेश केला तो भाग एखाद्या चिमुकल्या दिवाणखान्याप्रमाणं प्रशस्त, हवा, प्रकाश यांनी भरपूर व मोकळा होता. वरची पाटणी उंच असल्यामुळं त्याला ही शोभा आली होती. खोलीभर काथ्याच्या लांब चटया आंथरल्या होत्या. त्यावर आटोपशीर जाजम घातलं होतं. समोरच्या भिंतीला लागून एक पुस्तकाचं बिनदाराचं व त्याच्याच शेजारीं आरसा बसविलेलं दाराचं अशीं दोन कपाटं कांही अंतरानं ठेवलीं होतीं. त्यांच्या मध्यभागीं वरच्या बाजूस दत्ताची एक मोठी तसबीर होती व खालीं एक बैठं टेबल, त्यावर काच बसविलेली व फुलं भरून ठेवलेलं फुलदान होतं. उदबत्त्या लावलेलं एक सोंगटं होतं. सुगंध हवेत दरवळला होता.

कपाटाला लागून गादीची बैठक होती. दोन तक्के मांडले होते. एक लिहिण्यास बसण्याचें डेस्क होतें. एक दोन पुस्तकं व प्रुफांच्या गुंडाळ्या त्यावर होत्या.

डेस्कला लागून तक्क्याच्या आधारें एक प्रौढ पुरुष पुढं पाय पसरून बसला होता. त्यांच्या शेजारीं दहा वर्षांची एक मुलगी कांही विणकाम घेऊन बसली होती. या दोघांच्या समोर एक तरुण पुरुष व एक मुलगा पत्त्यांचीं पानं घेऊन बसले होते.

या चौकडीला धरून कोंडाळं होईल, अशा बारक्या चटया मांडल्या होत्या. त्या प्रत्येकीपुढं दोन दोन बश्या खाण्याच्या, केळीं व मधून दोन तीन पाण्याचे स्वच्छ तांबे व पाणी पिण्याचीं भांडीं होतीं. एकूण थाट प्रेक्षणीय होता.

आमचं आगमन होतांच तिथल्या मंडळींनी जरा आवरतं घेतलं. सर्वांची दृष्टि आमच्याकडे लागली. ताईंनी आम्हा दोघी मायलेकींना मधली दोन आसनं स्वीकारण्यास सांगितलीं. त्या वेळीं तो प्रौढ पुरुष सहास्य पण सौम्य स्वरांत म्हणाला, " या — या. — तुमचं स्वागत मला असं पडून करावं लागतं, निरुपाय आहे. पंण आलांत, आनंद वाटला. बसा, बसा. घटकाभर बसूं, गप्पा मारूं. "

तेवढ्यांत शामा व माधव चहाची तयारी घेउन आली. आमचं कोंडाळं तयार झालं.

ताईंनी हसत म्हटलं, " ही दोन धाकटीं मुलं. आवळीं जावळीं आहेत. मधु व माधवी. — ( तरुण पुरुषाकडे पाहत ) हे राजाभाऊ माझे भाऊजी. मुलं आपल्या वडिलांना अप्पा म्हणतात — "

आमचीं दोघांची कांही क्षण एक टक दृष्टादृष्ट झाली. दोघंहि किंचित् हसलों, संकोचत दुसरीकडे पाहूं लागलों.

आमचं कोंडाळं असं होतं. अप्पा व राजाभाऊ आम्हाला समोर त्या

दोघांत मधु. अप्पांच्या डाव्या हाताला माधवी, तिच्या अलीकडे माधव, माधवाजवळ ताई, ताईच्या अलीकडे आई. आईला लागून मी माझ्या जवळ श्यामा आणि तिच्या पलीकडे राजाभाऊ.

फराळाला व गप्पांना प्रारंभ झाला. अप्पांनी सूतोवाच केलं. ताईंनी आईची अनुमति घेत त्यांत भाग घेतला. मधु-माधवी यांचंहि बाल सुभाषित प्रगट झालं. श्यामा व माधव यांच्याहि कांही खुणा व खोड्या झाल्या. राजाभाऊ त्या दोघांना चेतवीत होते. मी उगीच हसत, श्यामेला हो ना म्हणत आणि राजाभाऊ वगळून सर्वांकडे पाहत होतें. पण माझें लक्ष कशांतच नव्हतं. आपलं इथं बहुशः जुळणार याविषयीं मला शंका राहिली नव्हती. फक्त मी स्वतःच्या मनाचा कल पाहत होतें. तरुण पुरुष या नात्यानं राजाभाऊंत मला कसलाच दोष दिसला नाही. वय व रूप, आरोग्य व शिक्षण यांत अनुरूपता होती. म्हणजे सारं ठीक होतं, जमण्यासारखं होतं.

—आणि एक गंमत झाली. मला साक्रीकर बाईंचा क्रेम आठवला! — मला आंतल्या आंत हसू आलं! त्या दोघांचा जोडा कसा दिसेल? — याचं चित्र मी जमवलं.

एक उमदा तरुण पुरुष आणि त्याला सहज खाकोटीला मारील व त्याला अक्का शोभेल अशी बाई— यांचा जोडा. पति पत्नी म्हणून!— वाहवा!— माझं आंतील हसूं एकदम उमटलं! आणि याच क्षणाला राजाभाऊंची नी माझी दृष्टादृष्ट झाली.!— माझ्या हास्याचा रोख आपल्यावर आहे असं त्यांना का वाटलं हें मला सांगतां येत नाहीं. पण त्यांना तसं वाटलं यांत शंका नाही. आणि त्यांची मुद्रा बावळटाप्रमाणं झाली!— ही मुलगी आपल्याला कां हसते बुवा?—काय चुकलं आपलं?—असं त्यांना वाटलं व ते गोंधळले. कारण, त्यांना वर नात्यानं माझ्यापुढं परीक्षा द्यायची होतीच!—मग ते कां न गांगरावें! — आणि ती त्यांची

चावळट स्थिति पाहून माझं हसूं आणखी वाढलं! — छेः! तिथं बसणं मला अशक्य झालं! मी विद्युद्गतीनं उठलें नी शिष्टाचाराचा कितीं भंग होतो याचा विचार न करितां बाहेर धावलें!— एकदम सैंपाकघरांत आलें! कशी कोणजाणे!— अन् पोटभर हसलें!— मागोमाग आली श्यामा! माझं हसणं पाहून ती थक्कच झाली!— तीहि हसूं लागली!— तिनं विचारलं "काय हो झालं बाई?"

बाई काय सांगणार?

मागोमाग आल्या ताई— त्यांच्या मागोमाग आई नी त्यांच्या मागं माधव— ताईंनी पुढं येऊन म्हटलं, "श्यामा, काय झालं ग?— काय भानगड आहे?—"

मी एकदम भानावर आलें. मी ताईंच्या मुद्रेकडे पाहिलं. तींत कडकपणा, आश्चर्य, व धाक होता. मी आईकडे पाहिलं. ती कष्टी, हताश व भयचकित झाली होती. माझ्या मनांतील हास्यरस एकदम मावळला व घडला प्रकार अगदीच गैर झाला, याची जाणीव मला तीव्रतेनं झाली. आता ही चूक सुधारून कशी घ्यायची? — कारण काय दाखवायचं? — हा मला मोठा पेंच पडला! — मी भारी बारी गांगरलें, भ्यालें, लज्जित झालें!

वरील सारा प्रकार क्षणा दो क्षणांत घडला असेल; लिहायला किती वेळ लागला!—पण दुसऱ्या क्षणाला मी निर्णय घेतला. मी ताईंच्यापुढं गेलें व पश्चात्तापयुक्त स्वरांत म्हटलं, "ताई, क्षमा करा. मी अगदी मूर्खासारखी वागलें हें मी मान्य करतें. माझ्या आताच्या कृतीनं बैठकीचा बेरंग झाला आहेच. पण माझ्याकडून तुमचा सर्वांचा अपमानहि झाला आहे!— आज तुम्ही आम्हा मायलेकींना का बोलावलंत, हें मी जाणतें. अर्थात् घडलेल्या प्रकारानं मी तुमच्या सगळ्यांच्याच मनांतून उतरणार यांत शंका नाही. पण करायचं काय? माझ्याकडून चुकलंय खरं."

वरील मनोगत मी अगदी भराभर व मनापासून बोललें. नंतर ह्याचा शेवट हुंदक्यांत झाला! हंसण्याचं हें दुसरं टोक होतं; क्षणच. ताई चटकन् माझ्याजवळ आल्या. त्यांनी मला जवळ घेतली व आपुलकीनं म्हटलं, "छेः, असं वाईट वाटून घेऊं नकोस. कांही विशेष बिघडलं नाही. कांही हसण्यासारखी गोष्ट घडली असेल म्हणून तूं हसली असशील नाही का?—त्याचं काय एवढं!—तुझा विनोद आम्हांला कळता तर छान झालं असत. आम्ही खूप हसलों असतों. (माझ्या आईकडे पाहत) नाही का आई?"

त्यांच्या या समजुतीच्या बोलण्यानं मला मोठा धीर आला. विशेषकरून त्यांचं पाठीवरून हात फिरवणं आणि तुकारानं संबोधणं मला भारी आवडलं. मी किंचित् बाजूला सरत म्हटलं, "मला असं सांभाळून घेतलंत तर किती छान होईल. —माझ्या हसण्याचं कारण सांगीन मी तुम्हाला. कदाचित् माझा तो आचरटपणाहि असेल —"

"जाऊं दे." ताई मध्येंच म्हणाल्या, "आतां आपण असं करूं या, मी पुरुषांचं पाहून येतें. मग आपण इथंच बसूं थोडा वेळ. (आईला उद्देशून व त्याचवेळीं दोन पाट मांडीत) आई, कुमूदसह बसा इथं. श्यामा, चल आपण खाण्याच्या बश्या वगैरे इकडेच आणूं—"

आम्ही दोघी मायलेकी राहिलों.

आई म्हणाली, "कुमे, काय ग तुझं हसणं नी असं मधेच पळून येणं. —आपल्या ताई चांगल्या आहेत म्हणून. पण तूं अगदीच खुळ्यासारखं वागलीस. —अन् हें बघ. सगळं ठीक दिसतंय्. जुळण्यासारखंहि आहे. यापुढं तरी जपून वाग हो."

मला आता पुष्कळच धीर आला होता. मी आईला चुचकारीत म्हटलं, "काळजी नको करूं. ताईंच्या मनांतील किन्तु मी टाकतें काढून. आजच्या आजच. थोडं बोलणं बसणं झाल्यावर तूं कांही निमित्तानं जा पुढं. मी येतें मागाहून. आगदी सर्वांना खुश करून येतें. मग तर झालं —"

आईला ही योजना फार बरी वाटली.

थोड्या वेळानं ताई, श्यामा, माधव, मधु, माधवी सगळीं माणसं आलीं. मला मोकळेपणा वाटला. सुमारे पंधरा मिनिटं आम्ही मजेंत घालविलीं.

मग ठरल्याप्रमाणं आई निघून गेली व मी मागं राहिलें. ताईंना तें बरं वाटलं. श्यामाहि माझ्या मागं मागं घुटमळत राहिली. माधवी थोडी बुजट होती. पण तिनं चुल्ती पुतणीचं नातं बोलण्यांत सहजच जोडून टाकलं होतं.

थोड्या वेळानं आम्ही दोघीच आवारांत एक पडक्या भागांत दगडी जोतं होतं, त्यावर जाऊन बसलों.

" मी मागं कां राहिलें, लक्षांत आलं तुमच्या ? " मी ताईंना किंचित् संकोचत विचारलं. ताई हसल्या व म्हणाल्या, " तूं आमच्या घरीं आता येणारच आहेस. तेव्हां तुला कांही मनमोकळेपणानं बोलायचं असेल, असं मला वाटतं. तुझे वडील येऊन सारं बोलून गेले आहेत. भाऊजींनी तुला पूर्वीच पाहिलं आहे. आम्हां सर्वांना तूं पसंत आहेस. तुझा विचार काय असेल तो खरा. आज तुला बोलावलं ते श्यामाच्या वडिलांनी पाहावं म्हणून. त्यांचाहि नकार नाही.—आता स्वतंत्रपणानं तुला कांही बोलायचं-सांगायचं असलं तर मनांत ठेऊं नको स्पष्ट सांग. कारण, आजचा निर्णय म्हणजे तुझ्या सबंध आयुष्याचा प्रश्न आहे. या वेळीं भीड धरण्यांत अर्थ नाही. "

मी त्यांच्याकडे किंचित् हसत—लाजत पाहिलं. नंतर बसलेल्या जोत्यावर बोटानं कांही आकृति काढीत म्हटलं, " शंका घेण्यासारखं व नकार देण्या-सारखं मला कांही दिसत नाही. वडिलांनी सर्व पाहिलं—ठरवलं आहेच. मग चिंता कशाची करूं ?—पुढचं कुणी पाहिलंय् ?—आहे त्यांत आनंद मान-ण्यांत गंमत आहे, नाही का ?—एकच विचारावंसं वाटतं. विवाहानंतर नोकरी करण्याचं स्वातंत्र्य मला राहणार आहे का ? "

" तुला तें कार्य मनापासून रुचत असेल तर आमची कुणाची आड-

काठी येणार नाही. आमचे राजाभाऊ स्वतंत्र विचाराचे आहेत. स्त्रियांचं आर्थिक स्वातंत्र्य त्यांना मान्य आहे– " ताई शांतपणें म्हणाल्या, " अन् माझं मत तूं चार पैसे स्वतंत्रपणें मिळवावे असंच आहे. मात्र नोकरीच्या नादांत संसाराकडे दुर्लक्ष न होईल, या संबंधीं तुला प्रथम पासून जपलं पाहिजे. घरांत पाय टाकला कीं तूं गृहिणी आहेस, एका पुरुषाची अर्धांगी आहेस–याचं स्मरण सतत ताजं राहील, असं तूं वागलं पाहिजेस.–अर्थात् हा धाक नव्हे व उपदेशहि नव्हे. तुझ्या कर्तव्याला तूं जागलं पाहिजेस, हें सांगायचं, तुझं सौख्य त्यावर अवलंबून आहे– "

मी त्यांच्या हातांत हात दिला नी म्हटलं, " तुम्ही मला वडील वहिणी-प्रमाणं आहां. आताचं तुमचं हें सांगणं मी कधीच विसरणार नाहीं. **Life is for living** म्हणतात. पण त्याची योग्य ती किंमत दिलीच पाहिजे, नाही का ? –"

" खरं आहे. " ताईनी अनुमति दिली.

" आतां मनांतला एक किन्तु काढून टाकतें. मी तेवढ्याकरितां आता थांबलें. " माझं हें बोलणं ताईना किंचित् नवलाचं वाटलं, तेव्हां मी पुढं म्हटलं, " मघा मी जें आचरटासारखं हसलें, त्याचा खुलासा करतें. "

" खरंच. " ताईनी सहास्य म्हटलं.

मी त्यांना घडलेला वृत्तान्त इत्थंभूत सांगितला. न हसतां सांगितला. ताईना तो पटला. त्या म्हणाल्या, " तुला हसूं येणं स्वाभाविक आहे. साकीकरबाई अर्धवट तरी असाव्या किंवा घायकुतीला तरी आल्या असाव्या. आपण त्यांनाहि योग्य तो न्याय दिला पाहिजे. मनुष्यस्वभाव आहे हा. तूं हें सारं विसरून जा. त्या बाईनं माझ्याकडे बरेच हेलपाटे घातले व भाऊजींचाहि पाठपुरावा केला. तिला तोडून टाकण्याचं त्यांना साधलं नाही. यामुळं ती आशेंत राहिली. तिला वाटलं–आपण जिंकूं–पण तिच्या धाकानं भाऊजी विवाहबद्ध होण्यास तयार झाले. नाही तर त्यांना इतक्यांत तो पाश नको होता. जाऊं दे. आपल्यापुरतं पाहूं या– "

— ३ —

## जाऊबाईंचं हितगूज

आज वटसावित्री. सुवासिनींचं फार महत्त्वाचं व्रत. सौभाग्यपद प्राप्तीनंतरचं माझं पहिलं.

खरंच मी आनंदांत होतें.

वडाची पूजा सकाळीं नवाच्या आंत उरकल्यामुळं मला नित्याप्रमाणं —रजा न काढतां —शाळेंत जातां आलं. दुपारच्या सुट्टीनंतर मात्र विचारून ये, असं जाऊबाईंनी सांगितलं होतं. त्याप्रमाणं मी अडीचला घरीं आलें.

वटसावित्रीची कथा सांगण्यास आमचे उपाध्येबुवाच आमच्या घरीं साडे-चारला येणार होते. आळींतील बायका त्याच वेळीं जमणार होत्या.

या कार्यक्रमाकरतां अप्पांची बसण्याची खोली घेतली होती. त्यांना माडीवर नेऊन बसविण्यांत आलं होतं.

मी घरीं आलें त्यावेळीं ताईंनी —जाऊबाईंनी —सर्व व्यवस्था करून ठेवली होती. त्याच खोलींत बसून त्या कांही विणण्याचं काम घेऊन बसल्या होत्या.

हातपाय धुवून मी त्यांच्याकडे गेलें नी म्हटलं, "घरांतलं कांही करायचंय्?"

"सध्या तरी कांहीं नाही —" ताई सहास्य म्हणाल्या, "चारला यांना चहा करून द्यायचा. नंतर शास्त्रीबुवा येतील. बायका जमतील. तोंपर्यंत काय करायचं ? —जावा जावा गप्पा मारीत बसूं या. ये, बैस, अशी जवळ." त्यांनी विणकाम बाजूला ठेवलं. मी त्यांच्या शेजारीं बसलें व म्हटलं, "तुम्हाला कांही विशेष बोलायचं आहे वाटतं ?" दोघींहि सरळ एकमेकीकडे पाहत हसलों.

माझ्या कपाळावर भुरभुरणारे केस प्रेमळ हातानं नीट बसवीत जाऊबाई म्हणाल्या, "मला तुझ्याशीं खरंच कांही बोलायचं आहे. तें महत्त्वाचं आहे कीं नाही, हें तूं विचार करून ठरव." त्यांनी दत्ताच्या तसबिरीकडे पाहिलं.

मी थोडी अस्वस्थ झालें. काय बरं बोलायचं असेल यांना ? — आपली कांही चूक सांगणार आहेत कीं, वेगळं राहण्याची प्रस्तावना आहे कीं —" माझ्या मनांत तरंग उठले.

"एकंदर संसाराविषयीं तूं कांही ठरवलं आहेस का ?" जाऊबाईंनी एकदम प्रश्न केला. किंचित् हसल्या व पुढं म्हणाल्या, "ज्याला कथा कादंबऱ्यांत जीवन म्हणतात."

प्रश्न वाकडातिकडा नव्हता. अवघडहि नव्हता. पण माझी तशी तयारी कांहीच नव्हती. यामुळं मी थोडी गोंधळलें. मी चाचरत म्हटलं, "खरं सांगायचं म्हणजे मी कांहीच ठरविलेलं नाहीं. तसा कांही विचार माझ्या मनांत आलेला नाही. सुदैवानं मला हें घर चांगलं मिळालं आहे, असं मला वाटतं. या घरांत येऊन मला महिना होऊन गेला. मला त्रास होईल किंवा विचार पडेल असं कांहीच घडलेलं नाही. अगदी माहेरीं असल्याप्रमाणं वाटतं. यांच्यासंबंधीं मी भाग्यवान् आहे. भाऊजी वडलाप्रमाणं वाटतात. तुम्ही— मनापासून सांगतें—माझ्याशीं अगदी प्रेमानं वागतां. माझे पुतणे पुतणी हीं मुलंहि चांगलींच आहेत. मग तक्रारीला जागा कुठं ?"

"अगदी बरोबर—" जाऊबाई म्हणाल्या, "चालू डाव अगदी ठाक-

ठीक आहे यांत शंका नाही.–तूं एक चांगली मुलगी आहेस, असं आमचं सर्वांचं मत आहे. तुझ्याविषयी आम्हाला प्रेमहि वाटतं.–उद्यां तें आणखी वाढत जाईल. प्रश्न आजचा नाही. पुढचा आहे. म्हणून मनमोकळेपणानं आतांच कांही गोष्टी बोलायच्या.–एक विचारतेः वेगळं बिऱ्हाड करण्याचा विचार मनांत आला का ?–तुझ्या माहेरीं तसा कांही सूर निघाला का ? ”

मी किंचित् पुन्हा अडलें. नंतर सरळ शब्दांत म्हटलं, “ वेगळं बिऱ्हाड करण्याचं मनांत आलं नाही. पण एकत्र किती दिवस राहायचं ?—असा एक तुरळक विचार मैत्रिणींशीं बोलतांना निघाला, हें खरं—”

“ बरोबर—” जाऊबाई म्हणाल्या, “ मला हें सांगायचंय् कीं, आपण फुटायचं नाहीं. एकत्र व एकोप्यानं राहून आपण आपल्या कुलाची प्रतिष्ठा राखायची व वाढवायची.—आपलं कुटुंब बकाल नाही. आटोपशीर आहे. एकत्र राहून आपण किती तरी चांगल्या गोष्टी तडीला नेऊं. ”

या त्यांच्या बोलण्यांत एक विशेष आवेश होता. मला त्याचा नीट बोध झाला नाही. नवल मात्र वाटलं. मी तें मुद्रेवर न दाखवतां म्हटलं “ माझं सहकार्य मिळेल एवढं मी सांगतें. ”

“ आनंदाची गोष्ट आहे—मला ती खात्री आहे, म्हणून तर मी आपलं मनोराज्य तुला सांगून टाकण्याचं ठरविलं— ” ताई माझ्या पाठीवर थाप मारून म्हणाल्या, “ आता मी काय सांगतें तें नीट लक्ष देऊन ऐक बरं का.—कुमुद, तूं वयानं अद्याप फारशी पोक्त नाहीस. शाळेंत जाऊन शिक्षकिणीचं काम करीत असलीस तरी एकंदर परिस्थितीचा अनुभव तुला कमीच असणार. नाही का ?— पण एक गोष्ट तुला चटकन् पटेल. आपला सर्वसाधारण मध्यम वर्ग दिवसेंदिवस भयंकर दरिद्री होत चाललाय्. साध्या अन्न वस्त्रालासुद्धां आपण महाग होत चाललों आहों. प्रत्येक संसारी मनुष्य नाना प्रकारच्या चिंतांनी अगदी पूर्ण ग्रासून गेला आहे. ”

“ ब्राह्मणांचे हाल तर कुत्राहि खात नाही ! —” मी कळवळून म्हटलं,

"उच्च पातळींत राहणाऱ्या या वर्गाचं एकंदर जीवनचित्र फारच भेसूर व मोठं निराशाजनक आहे.— पुन्हां नवल असं. ही जात तसं सबळ कारण नसतां सर्वांच्या द्वेषास व तिरस्कारास पात्र झाली आहे! केवढं दुर्दैव आहे नाही का?—"

ताई खिन्नतेनं हसल्या व म्हणाल्या, "हं— शिवाय या जाचाबद्दल आपण तक्रारहि करतां कामा नये.— जग म्हणतं त्याप्रमाणं ब्राह्मणांकडून कांही तरी फार मोठं पातक घडलं आहे व त्याचं प्रायश्चित्त आपण भोगतों आहों, असं आपण धरून चालूं, पण एवढ्यानं आपला प्रश्न सुटणार नाही. आपण आत्मपरीक्षण केलं पाहिजे. दुसऱ्यांवर रुसण्यांत अर्थ नाही. हताश होऊन गप्प बसण्यांतहि अर्थ नाही. कर्तव्य केलं पाहिजे नी कर्तृत्व दाखविलं पाहिजे. या गोष्टीला स्वतःच्या कुटुंबापासून सुरुवात. ज्याला कळतं त्यानं सावध होऊन लागलीच कामाला लागलं पाहिजे—"

"आपल्याला हें अगदी कबूल—"

"आपल्या कुटुंबाकुटुंबागणिक मोठा दोष निर्माण झाला आहे तो हा कीं, मिळवता एक नी खाणारीं तोंडं अनेक. गेल्या दोन तीन पिढ्या हा दोष घडत गेल्यामुळं आम्ही दरिद्री होत चाललों. दारिद्र्यामुळं भांडणं वाढलीं. भांडणांमुळं प्रेम तुटलं नी प्रेम आटल्यामुळं जीवन भकास झालं!— पटतं माझं बोलणं?"

"कुणाला नाही पटणार?—" मी त्यांच्या चतुरस्र बोलण्याचं नवल करीत व त्यांच्याकडे आदरानं पाहत म्हटलं, "गेल्या महिनाभराच्या सहवासांत मी एवढंच पाहिलं होतं कीं, तुम्ही एक कुशल सुगृहिणी आहां. पण आतांच्या तुमच्या बोलण्यावरून असं दिसतं कीं, संसाराचा गाडा ओढतांना आजच्या स्त्रियांनी समाजस्थितीचाहि विचार करायला हवा. तसा तुम्ही निःसंशय केला आहे. अर्थात् तुमच्या हाताखालीं राहून मला संसार करावयाचा असल्यास मी तुम्हाला योग्य तो मोठेपणा देऊन, तुमचं सहकार्य केलं पाहिजे. तुमच्या सांगण्याप्रमाणं वागलं पाहिजे."

"अगदी बरोबर—" जाऊबाई माझ्या बोलण्यानं खुलल्या व म्हणाल्या, "माझा विचार तुझ्या गळीं लौकर उतरला हें खरंच छान झालं. आपलं दोघींचं चांगलं जमेल. आपण समंजसपणानं जमवूनहि घेऊं.— कुमूद, सध्या आहे त्यांत टुकीनं संसार करणं, पैसा वाचविणं, थोडीफार शिल्लक टाकणं नी आपली सामाजिक अप्रतिष्ठा न होऊं देणं इत्यादि गोष्टी अत्यंत कठीण होऊन बसल्या आहेत. केवळ नवरा बायकोच्या एकेरी कुटुं-बाला तें कठीण आहे. मग ज्या स्त्रीपुरुषांना चार मुलंबाळं आहेत, त्यांनी गोष्ट बोलायला नको. म्हणून प्रत्येक जाणत्या माणसानं आपला भार कमींतकमी जाणवेल याला जपलं पाहिजे. कांही मिळवलं पाहिजे. दुसऱ्याला पूरक झालं पाहिजे.— "

त्या कांही क्षण थांबल्या, किंचित् हसल्या व पुढं म्हणाल्या. "भाऊ-जींच्याकरितां मी मिळवती बायको पाहिली ती एवढ्याकरितां. तूं पगार मिळवते आहेसच. भाऊजी आज कांही मिळवते आहेत. उद्यां वकील झाल्यावर आजच्याएवढं त्यांना मिळत राहील. जास्त मिळत गेलं, चांग-लंच आहे. मी आपला संसार सांभाळतें. ते पंगू आहेत. पण बसल्याबसल्या ते पोटापुरतं मिळवताहेत. राहिलीं मुलं. त्यांनीं विद्याभ्यास करून कांही मिळवलं पाहिजे. माधव तसा उपयुक्त होऊं लागला आहे. मधूची शक्तिहि मी वाया जाऊं देणार नाही. श्यामा-माधवी यांनाहि कामं आहेत."

"अं—हं—" मी एकदम म्हटलं, "हा विचार मला फारसा भावत नाही. बिचारीं मुलं. त्यांच्या मागं जीवनाची ही पराणी आतांपासून कशाला लावायची. आपण वडील माणसं मग कशाला आहोंत! त्यांचं बालपण त्यांना निर्वेधपणानं भोगूं दे!"

ताई चपापल्या. क्षणमात्र त्यांनी माझ्याकडे पाहिलं. त्या किंचित् माझ्या-कडे सरल्या. त्यांनी मला कुरवाळीत म्हटलं, "कुमूद, कित्ती चांगलं व प्रेमळपणाचं बोललीस! तुझ्याविषयी माझी परीक्षा चुकली नाही, माझं मी

अभिनंदन करतें. अन् तुला आशीर्वाद देतें. " त्यांच्या डोळ्यांत मला आनंदाश्रु दिसले. त्यांनी माझ्या पाठीवर ठेवलेला हात मला भारी वात्सल्याचा वाटला.

आम्ही त्या वेळीं जावा जावा नव्हतों. बहिणी बहिणी होतों. ताई पुढं म्हणाल्या, " या मुलांच्याकरितां आपण एकत्र राहूं या. आपल्या सर्वांच्या सुखसोयींकरितां एकत्र राहूं या. "

" माझी ना नाही या विचाराला— "

" मग आतां आपल्या संसाराचीं सारीं सूत्रं माझ्या हातांत असलीं पाहिजेत, हें ओघानं आलं. साऱ्यांची मिळकत माझ्याकडे येणं नी पैन् पैचा खर्च माझ्या सम्मतीनं होणं आवश्यक आहे, नाही का?— " जाऊबाई कांहीसा अधिकार दाखवीत म्हणाल्या, " तुझा पगार माझ्या हातांत आला पाहिजे नी कोणताहि खर्च मला सांगून आणखी विचारून झाला पाहिजे— "

मी कांही बोललें नाही. पण हा विचार, हें परावलंबन किंवा बन्धन मला मनांतून सुसह्य वाटलं नाही. मी थोडी विचारांतच पडलें. माझी अस्वस्थता जाऊबाईंच्या ध्यानीं आली कीं नाही, कोण जाण!— का त्याची पर्वा करणं त्यांना योग्य वाटलं नाही, कांही सांगतां येत नाही. त्या पुढं म्हणाल्या, " संसाराचीं व जमाखर्चाचीं सारीं सूत्रं माझ्या हातांत द्यायचीं, याचा अर्थ तुला घरांत कांहीच किंमत नाही असा मात्र नाही. तुझ्या मिळकतीची मालकीण तूंच. संसारांत निम्म्याची भागीदारीण तूंच. बहुशः सर्व गोष्टींत तुझं मत घेतलं जाईल. तुला योग्य तो मान दिला जाईल आणि तुझं स्वातंत्र्यहि कायम राहील. तुला मोकळेपणा वाटेल असा कारभार पाहिला जाईल. फक्त वरिष्ठपणा माझा राहील. माझ्या म्हणण्याप्रमाणं तुला वागावं लागेल. आतापर्यंत या घरांत मी प्रमुख व इतर माझ्या हाताखालचीं अशी मी वागलें आहें. माझीं मुलं, पति व भाऊजी माझ्या शद्बा-

बाहेर जात नाहीत. तुलाहि जातां येणार नाही.-- काय समजलं ? ”

माझ्या ओठांत आलं : “मग मला स्वातंत्र्य आहे, याचा अर्थ काय ?— ” पण शद्ब बाहेर पडले नाहीत. मी मुकाट राहिलें. खालीं पाहूं लागलें. जाऊबाईंनी माझी अनुमति गृहीत धरली. त्यांनी हात पुढं केला नी म्हटलं, “ वचन दे पाहूं, मी याप्रमाणं वागेन म्हणून—— ”

कां कोण जाणे, मी त्यांच्या हातांत हात दिला व दुर्बलपणानं म्हटलं, “ तुमच्या मर्जीप्रमाणं कराल तें खरं— ” हें वाक्य माझं वचन म्हणतां येईल का ? मुळीच नाही. ताईंच्या चातुर्याचा विचार करतां, त्यांना माझ्या वरील वाक्यांतील अनिच्छा वा उदासीनता आकलन व्हायला हवी होती. पण तसं कांही दिसलं नाही. मग माझ्याकडून कसलं का होईना, केवळ वचन घ्यायचं होतं की काय कोण जाणे !— माझं मन व्यथित झालं. मला त्या गोष्टीचा रागहि आला. आपण बोलावं का कांही स्पष्ट ?— कीं, पुढं केव्हां तरी संधि साधावी ? अशा संदेहांत मी पडलें आहें तोच जाऊबाई म्हणाल्या, “ आता माझ्यासंबंधीं थोडी विशेष माहिती देतें. इतरांकडून कांही तरी भलतं कळण्यापेक्षा मीच माझी खरी हकीगत सांगतें. वाटल्यास विश्वास ठेव—ठेऊं नको.— एवढं निश्चयानं व अभिमानानं सांगतें, मी सांगतें तें खरं. जगांतून ऐकूं येईल तें सर्व खोटं-- ”

परीट घडीच्या कपड्याला हात घालायला जावं नी त्यावर नांगी वर करून चाललेला विंचू दिसावा, तशी माझी अवस्था झाली. मी अडखळत म्हटलं, “ म्हणजे काय ? ”

जाऊबाई हसल्या व शांतपणें म्हणाल्या, “ सांगतें. माझ्या जीवनांत मी एक कठोर परीक्षा दिली आहे.-- आज माझं वय पस्तीस छत्तीस आहे.-- पण .माझं पहिलं लग्न झालं मी अठरा वर्षांची असतांना. मी दुर्भाग्यवती झालें. ”

“ हं——” मी आश्चर्योद्गार काढला.

" या नवऱ्याशीं मी कसा तरी संसार केला !–" बाई सांगूं लागल्या, " पुढं कुणाचं चुकलं नी काय काय विपरीत झालं, काय सांगावं ! —एवढं खरं. मी नवऱ्याला सोडलं किंवा त्यानं मला टाकली ! विसा बाविसांत असतां—— "

" अय्या ! "— एवढा उद्गार काढून मी पाहतच राहिलें. ताई सुगृहिणी म्हणून प्रसिद्ध. माझा चालूं अनुभव तोच. पण कालानं आपल्या पडद्याआड लपविलेला हा देखावा किती विचित्र !— मी मूढपणें पाहत राहिलें.

कांही विचार करीत ताईंनी डोळे किलकिले केले. मजकडे पाहिलं. नंतर त्या म्हणाल्या, " कुमूद, मी स्वभावतः तापट व मानी आहें. यामुळं मी चांगली आहें व वाईटहि !– आजहि मला माझ्या त्यावेळच्या वर्तनाची खंत वा लज्जा वाटत नाही.–त्या दुर्दैवी कालांत म्हणजे नवऱ्याघरीं नांदत असतां, मला मूल झालं नाही, ही देवाची मोठी कृपा समजतें.— या नंतर मी देवाला आणखी नवस सायास केले, देवाची फार करुणा भाकली– "

" मरण येऊं दे म्हणून— ? " सहानुभूति कशी दाखवायची हें न कळल्यामुळं मी कांही तरी बोललें.

" हो— " ताई म्हणाल्या, " मला स्वतःला नव्हे. बुजगावणं झालेल्या नवऱ्याला ! "

" खरंच !— " कांहीतरी उद्गार.

" या गोष्टीचं दुःख नाही. पण आनंदहि नाही. " ताई किंचित् नरमून म्हणाल्यां, " पण कोंडलेली हिंदु अबला काय करणार ?— पुष्कळदा सधवेपेक्षा विधवाच सुखी ठरते. "

मी कांही बोललें नाहीं. ( हो म्हणावं वाटलं. पण धीर झाला नाही.) तेव्हा ताईच पुढं म्हणाल्या, " सुदैव असं. त्यानंतर वर्षाभरांतच मी विधवा झालें. मला हांयस वाटलं. माझ्या पायांतील खोडा सुटला. मग मात्र

मी ताजीतवानी झालें. सासरच्या माणसाशीं पोटगीकरतां भांडलें आणि नावडत्या नवऱ्याची तीन हजाराची विमा पॉलिसी मिळवली.— त्या वेळीं माधवाच्या वडिलांची मला अत्यंत मदत झाली—

" यांतून मग द्वितीय संबंध निर्माण झाला ? " मी सहज विचारलं. पण लागलीच मी चपापलें. मी म्हटलं, " छेः, असा प्रश्न मी विचारायला नको होता, नाही का ?-- चुकलंच तें— "

ताई हसल्या व म्हणाल्या, " कांही विशेष नाही. खरी गोष्ट अशी आहे कीं, यांची पहिली पत्नी माझी जिवलग मैत्रीण होती. ती मधु-माधवी या जुळ्याच्या वेळीं आजारी पडली व या आजारांत तिचा अंत झाला !— मरतेवेळीं मी तिला तुझ्या मुलांचा सांभाळ करीन असं वचन दिलं— "

" म्हणजे ?— हीं चारीं मुलं तुमचीं नव्हेत ?— नवल आहे. लोकांना हें कळणारसुद्धा नाही— " मी सहानुभूतीच्या स्वरांत म्हटलं, " मला तरी हा सावत्रभाव ओळखतां आला नाही. खरंच. तुमचं हृदय किती थोर असलं पाहिजे ! "

" तसंच कांही म्हणतां येणार नाही. मी पंचवीस वर्षांची म्हणजे ऐन तारुण्यांतच होतें— " ताई मनमोकळेपणानं म्हणाल्या, " मला कोणाच्या तरी आधार पाहिजे होता. संसार सौख्यहि हवं होतं. म्हणून आम्ही दोघं पोकळ मैत्रीचं किंवा बंधुभगिनीच्या नात्याचं सोंग न करतां सरळ विवाह-बद्ध झालों. "

" खरंच योग्य केलंत— "

" मला स्वतःला धन्यता वाटते ती निराळी. " ताई म्हणाल्या, " या नव्या संबंधांत मला स्वतःला मुलं होऊं नयेत अशी माझी तीव्र इच्छा होती. माझी कूस वांझ असावी असा माझा ध्यास होता.— अन् मी भाग्यवान् अशी देवानं तेंहि गाऱ्हाणं ऐकलं ! कसलाहि उपाय न योजतां–कोणत्याहि चिंतेंत न पडतां मी वांझच राहिलें !— यामुळं आज मी सौभाग्यवती आहें. पण पुत्रवतीहि आहें. "

" अप्पा पंगू झाले नसते तर किती छान झालं असतं, नाही का ? " मी खेदानं म्हटलं.

ताई म्हणाल्या, " तो योगायोग आहे. पांच सहा वर्षं मी त्यांच्या संगतींत मोठ्या सुखांत काढलीं. तेव्हां त्यांचा पंगूपणा ही परमेश्वराची इच्छा असं मी मानतें. आज त्यांच्या सेवा-शुश्रूषेची संधि मिळाली आहे. कांही बिघडलं नाही, मुलं बाळं, पति, दीर अन् आता तूं धाकटी जाऊ आलीस. काय कमी आहे मला ?— उत्तम संसार करण्याची आकांक्षा अद्याप मला आहे.— अन् मी तो करून दाखवीन. "

— ४ —.

## साक्रीकरबाई अन् आमच्या एक वन्सं.

आज आमच्या घरचा गणपती पोचवावयाचा होता. जाऊबाईंची आज्ञा होती, " जमलं तर दोघंहि लौकर घरीं या. " त्याप्रमाणं शाळा सुटतांच आम्ही दोघं पति-पत्नी घरीं येण्यास निघालों.

वाटेंत हे म्हणाले, " काय हो कुमुदबाई, असं ऐकतों कीं, साक्रीकर-बाईंच्या वरील तुमचा राग अद्याप गेला नाही— "

" मी त्यांच्यावर राग करतें, असं तुम्हाला कुणी सांगितलं ? " मी अपांग दृष्टीनं त्यांच्याकडे पाहत म्हटलं, " त्या थोर बी. ए. बी. टी. बाई. त्यांच्याशीं मी कशाला हो राग लोभ धरूं—"

" असं ?—" हे म्हणाले, " मग त्या आपल्याला या रविवारीं जेवायला बोलावणार आहेत, तें आमंत्रण स्वीकारायला तुझी कांही हरकत नाही तर ? "

" तुम्ही जा. — मी येणार नाही. " मी चटकन् सांगून टाकलं. पण साक्रीकरबाई आम्हा दोघांना जेवायला बोलावणार ही गोष्ट मात्र मोठ्या नवलाची होती.

" Jealousy thy name is woman — " हे विरक्तभाव दर्शवीत उद्गारले.

" अगदी — अगदी खरं आहे तें — " मी गांभिर्याचा आव आणून म्हटलं, " आपल्या आर्यऋषींनी स्त्री ही अवगुणाची खाण हें मागंच सांगून टाकलंय्. आतां तुम्ही त्यांत आणखी भर ती काय घालणार? "

" हें पाहा–माना मुरकत बी भुवया उडवीत उगीच व्याख्यान देऊं नकोस–तुमच्या या गोड अभिनयाकडे आम्हा पुरुषांचं फारसं लक्ष जाईनासं झालं आहे. कथा कादंबऱ्यांत तें ठीक आहे. लेखकांना तें वर्णन करण्याचा कंटाळा येत नाही. पण नित्याच्या व्यवहारांत आमच्यासारख्या तरुणांना तिकडे लक्ष देण्यास सवडच मिळत नाही. तुझ्यासारख्या सुजाण तरुणीनं याचा विचार केला पाहिजे. "

" हें तुमचं बोलणं व्याख्यान नव्हे असं मी गृहीत धरतें. मुद्याची गोष्ट बोलूं. मी जलिस असतें तर तुम्ही जा जेवायला असं मी म्हटलं नसतं, होय की नाही ?–तेव्हां वाद खलास. आता पाय उचला जरा— "

" जो हुकूम– " हे हसत म्हणाले.

आम्ही झप झप चालूं लागलों. माझ्या मनांत मात्र साक्रीकरबाईंनी आम्हा दोघांना जेवायला बोलावण्याचं सोंग कां काढलं आहे –हा प्रश्न मधून मधून डोकावूं लागला. असो.

रात्रीं मी जाऊबाईंच्यापुढं तो प्रश्न काढला. मी हसत म्हटलं, " ताई, एक गंमत सांगतें तुम्हाला.–साक्रीकरबाईंनी आम्हां दोघांना जेवायला बोलावण्याचं ठरवलं आहे. "

" मग अडायचं कशाला ?– " ताईंनी हसत म्हटलं, " त्यांनी बोलावलं तर होय म्हणायचं नी जाऊन जेवून यायचं. "

" माझ्या मनाला नाही हें पटत. "

" कां बरं ?–तुझा त्यांचा वाकुडपणा थोडाच आहे ? "

" ती बाई माझ्याशीं अगदी चमत्कारिक वागली–" मी म्हटलं,

" तिच्याविषयी मला मुळीच आदर वा प्रेम वाटत नाही.– आम्हा दोघांशीं पुन्हा संबंध ठेवायला तिला संकोच कसा वाटत नाही कोण जाणे. —तुमच्या भावोजींना जाऊंदे पाहिजे तर. मी कांही जाणार नाहीं. "

ताई माझ्यासमोर आल्या व म्हणाल्या, " वेडी आहेस. मनुष्य स्वभावाची गम्मत पाहायची तर तूं अवश्य गेलं पाहिजेस–माझा आग्रह नाही. तुमच्या या भानगडींत मी मुळीच आड येणार नाहीं.–पण आपलं माझं मत सांगतें.–तूं जावंस हें बरं. " नंतर त्यांनी किंचित् थांबून प्रश्न केला, " राजाभाऊंचं यावर काय मत आहे ? "

" ते जायचं म्हणतात– "

" मग बेलाशक जायचं–साक्षीकरबाई जर मघला घडलेला सारा प्रकार विसरायला तयार आहेत, तर आपण कशाला तो आठवत बसा. "

" पण त्यांचं तरी हें केवढं धाडस ! " मी नवल दर्शवीत म्हटलं, " त्यांना संकोच कसा वाटत नाहीं आमच्याशीं असा लघळपणा करण्याचा ?–ज्यांना ज्यांना माहीत आहे, त्यांना काय वाटेल ? "

" हें बघ कुमूद— " जाऊबाई समजुतीच्या स्वरांत म्हणाल्या, " मनुष्य स्वभावांतील ही गम्मत सहज उलगडण्यासारखी नाही. आपण त्यांतल्या त्यांत विचार करायचा. समजुतीनं घ्यायचं. साक्षीकरबाईंनी तुझा कांही अपराध केलाय् का ?— नाही. अपमान ? — नाही. फक्त राजाभाऊवर माझा क्लेम आहे, असं कांही तरी बोलून तिनं तुला दटावलं होतं. — पुढं फजिती कुणाची झाली ? — तिची. — बरं, या गोष्टीचा तिनं डांगोरा पिटला होता, असं मुळींच नाही.— झाल्या गोष्टी होऊन गेल्या— मनांत कशाला उगीच जळमटं ठेवायचीं !— साक्षीकरबाई सख्य चालू ठेऊं पाहताहेत. आपण कशाला दूर राहायचं ! — कुमूद, जीवनांतील एक रहस्य सांगतें. — माणसं नेहमी जोडावीत. तोडूं नयेत.— कांही सबळ

कारण घडल्यावाचून वा दिसल्यावाचून उगीच संशय घेऊं नये. सावध असावंच असावं. पण संशयी असूं नये. तुझं तें इंग्रजींत कांही आहेना, forget and forgive. तसं वागावं.— कुणाचं – कोणत्या वेळीं — कसं साह्य लागेल, याचा कांही नेम नाही.— संसारांत शक्य तो मिळतं घेणं यांत हित आहे. जें घरांत, तेंच जगांत. स्वतःच्या स्वभावाला थोडी मुरड घातली पाहिजे."

ताईचं हें लांबलचक बोलणं गैर नव्हतं. मला तें मान्य करावं लागलं. पण तरीहि साक्रीकरबाईंचं निमंत्रण स्वीकारणं मनाला प्रशस्त वाटेना.

—आणि घडायचं तें घडलं. त्या शनिवारींच साक्रीकरबाईंनी वर्गांत चाललें असतां मला गाठलं. आमंत्रण दिलं. रविवार असल्याचं सांगितलं. नी म्हटलं, "उद्यां सकाळीं मी तुमच्या घरीं येऊन तुमच्या जाऊबाईंकडून परवानगी काढीन —"

मी स्वतःशीं हसलें. या चेंगटपणाला काय म्हणायचं? आणि मला त्या दिवशींची ती धमकी – तो आवेश – तो रागीट चेहरा आठवला!— आमंत्रण स्वीकारण्यांत गंमत! – स्वतःला बजावलं.

बोलल्याप्रमाणं साक्रीकरबाई अगदी सकाळींच आल्या. माझ्या जाऊबाईहि तयारच. हसण्याखेळण्याचं वातावरण लागलीच निर्माण झालं. कांही वेळ अप्पांच्या खोलींत नी कांही वेळ सैपाकघरांत बसून आम्ही गप्पा केल्या. आम्ही सगळींच एकमेकांशीं अघळपघळ बोललों. चहापान झालं. "बरोबर साडेदहाला यायचं अं—" साक्रीकरबाईंनी बजावलं. "कांही मदत?—" ताईंनी सुचवलं. "दोन विद्यार्थिनी बोलावल्या आहेत. तशी अडचण नाही." सा. बाईंनी सांगितलं. त्या निघून गेल्या.

आमच्या जाऊबाईंचं शिक्षण किती याचा थांग मला लागला नव्हता. पण त्यांचं पाठान्तर चांगलं असावं. साक्रीकरबाई गेल्यावर त्या माझ्या पाठीवर थाप मारून म्हणाल्या,

"परान्नं प्राप्य दुर्बुद्धे, मा प्राणेषु दयां कुरु।
परान्नं दुर्लभं लोके प्राणा जन्मनि जन्मनि ॥

काय? —" त्या मनापासून हसल्या. मीहि खूपच हसलें.

पुढं सार्‍या गोष्टी यांत्रिक पद्धतीनं घडल्या. आम्ही दोघं वेळेवर गेलों. साक्रीकरबाई, दोन विद्यार्थिनी व आम्ही दोघं कोंडाळं करून भोजनास बसलों. भोजन मजेंत झालं.

पुढं हे निघून गेले. विद्यार्थिनी निघून गेल्या. आम्ही दोघींच मागे राहिलों. मध्यंतरी एखादा कटु प्रसंग घडून गेला असेल हें दर्शविणारा एकहि शद्ब साक्रीकरबाई बोलल्या नाहीत. किंवा तशापैकीं कांही भावहि त्यांनी दाखविला नाही. यामुळं गंमत अशी झाली की, मीहि तावत्काळ सारं विसरून गेलें.

कांही काल सटरफटर बोलणं झाल्यावर साक्रीकरबाई म्हणाल्या, "रायकर माझ्या मनांत एक कल्पना घोळते आहे. मॅट्रिकच्या परीक्षेला बसणार्‍या विद्यार्थिनींकरितां एखादं उद्‌बोधक पुस्तक लिहावं. तुम्ही मदत कराल. किंबहुना दोघी मिळून हें गाईड लिहून काढूं या. शिक्षक नात्यानं तुमचा लौकिक चांगला आहे. माझंहि नांव कांही सामान्य नाही. — करूं या दोघी प्रयत्न. — मी काय सांगतें, नीट समजून घ्या.— आतापर्यंत अशीं कांही पुस्तकं निघालीं आहेत. पण तीं सर्वसाधारण विद्यार्थ्यांकरितां. मुलांपेक्षां मुलींची मेंटॅलिटी अगदी वेगळी असते. हा विशेष आपण लक्षांत घ्यायचा. अभ्यासक्रमांतील सोपेपणा मुलींच्या दृष्टीनं दाखवून दिला पाहिजे. असं एखादं गाईड पाहिजे—"

मला त्यांची ही कल्पना अभिनव वाटली. मग सा. बाईंनी आणखी पुष्कळ बोलून पुस्तकाची रूपरेखा मला नीट समजावून दिली.

मी मान डोलावीत म्हटलं, "असं कांही नवीन करून पुढं यायला माझी कांही हरकत नाही. पण यापुढं मला वेळ कसा होणार हा प्रश्न

आहे. मी टीचर्स डिप्लोमा घेण्याचा विचार केला आहे. आपल्या शाळेच्या चालकांचा तो आग्रह आहे. आमच्या यांचीहि तो इच्छा आहे. 'मी एल् एल्.बी. झालों कीं तूं T. D. झालं पाहिजेस.' असं त्यांनी बजावलं आहे. तेव्हां मी आतां त्या नादाला लागणार. मग कसं जमायचं?— त्यांत पुन्हा संसाराचा थोडा तरी भार मजकडे आहेच. आमच्या जाऊबाई सारं पाहतात. मी माहेरी असल्याप्रमाणंच आहे. तरीपण कांही गृहकृत्यं मला उरकावीं लागणारच."

"अं:!—" सा. बाई म्हणाल्या, "T. D. चा अभ्यास तो काय—न् घरचीं कामं तीं काय!— एक वर्षाचा कोर्स. मी तुम्हांला खूप साह्य करीन. गृहकृत्यांतून सुटका व्हावी म्हणून मी तुमच्या जाऊबाईंना भेटेन. काय समजलं. आपण गाइड काढण्याचा उपक्रम करूं याच."

त्यांनी माझ्याकडून वचन घेतलं. स्वतःशीं त्यासंबंधीं विचार करीत मी घरीं आलें. आधी यांना ती कल्पना सांगितली. त्यांनी एकदम प्रोत्साहन दिलं. जीवनाचा गंभीरपणें व साधकबाधक विचार करण्याची यांना सवय नव्हती, अशी माझी कल्पना आहे. "वाहवा!—छान." असं म्हणून पसंती दाखवणं अन् नापसंती असल्यास तो विषय उडवून लावणं हा यांच्या हातचा मळ होता. त्यांना स्वतःची मिजाज माहीत नव्हती. पण माझीहि पत्राज ठेवण्याची त्यांना आवश्यकता वाटत नव्हती. फाटिंग पुरुषवृत्तीचा तो एक नमुना होता.

त्या रात्रीं—

दिवसां घडलेल्या एकूण प्रसंगाचं विहंगावलोकन चित्र दृष्टीपुढं सरकूं लागलं. हे गाढ झोपीं गेले होते. भोंवतीं अंधार होता. यांच्या पाठीला पाठ लावून मी पहुडलें होतें. एक शंका सारखी डाचत होती. साक्रीकरबाई तो प्रसंग विसरल्या कशा?— गाइड काढण्याची कल्पना एकाएकी उद्भवली आहे कीं, परिपक्व विचारांतून अवतरली आहे?— माझ्या सहकार्याची आवश्यकता कां वाटावी?

दांडगा विकल्प !– स्नेह ठेवण्याचं सोंग करीत यांची मैत्री जमविण्याचं तर हें चिन्ह नव्हे?— असं असेल तर?-- केवढा विचित्र मुखवटा या बाईनं धारण केला आहे!

– आणि वरच्याशीं काडीचा संबंध नाही असा दुसरा विकल्प एखाद्या भुताप्रमाणं अवचित उपटला! – आमच्या जाऊबाईसंबंधीं त्यांनीहि असा एखादा मुखवटा धारण केला आहे का? गोड बोलणं, प्रेमळ वागणं नी थोर विचार बोलून दाखवणं याला कांही सरळ अर्थ आहे कीं, परमार्थाच्या पोटीं स्वार्थ दडलेला आहे?— काय समजावं? जाऊ मिळवती. दीर मिळवता. त्यांच्या जिवावर आपला संसार सुखानं चालविण्याची हाव धरायला हरकत कोणती?— संशय हा झोटिंग महा— असं कुठंतरी म्हटलं आहे तें कांही खोटं नाही. त्यानं जें जगाचं रूप दाखवलं तें किती काळं नी भयानक!

हे गाढ झोपलेले. अगदी निकट होते ते. पण त्यांचा कसलाच आधार मला वाटत नव्हता!

मला केव्हा झोप लागली कोण जाणे!

दिवाळी आठ दिवसांवर आली. माहेर अद्याप तरी गांवांत होतं. यामुळं दिवाळीला माहेरीं जाण्याचं आकर्षण मनाला फारसं नव्हतं. नित्यक्रमांत बाध येण्यासारखं कांहीच नव्हतं. फक्त मनाला छंद लागला होताः भोवतालच्या माणसांच्या तोंडावर कांही मुखवटे आहेत का?

— आणि त्या मनाला एक निराळं खेळणं मिळेल अथा एक नवा प्रकार आमच्या संसारांत घडला.

सकाळीं दहाचा सुमार असावा. जाऊबाई सैपाकाला लागल्या होत्या. मी शाळेंतील मुलांचे पेपर तपाशीत बसलें होतें. हे आपलीं कायद्याचीं पुस्तकं घेऊन चाळीत बसले होते. तितक्यांत श्यामा दारांत येऊन म्हणाली, "काकू, न्हाणीघर मोकळं आहे. बंब तापला आहे." ती निघून गेली.

"आलेंच—" मी समोरचा पसारा आवरीत यांना म्हटलं, "तुम्ही घेतां का आधी उरकून——" यांनी कांही न बोलतां नुसतीच मान हलविली. मी खालीं आलें. तोंच— हाक आली: "अप्पा आहेत का!— राजाभाऊ——"

मधू-माधवी अंगणांत होती: दोघंहि ओरडली, "ताई — ताई, आत्याबाई आल्या —— आत्याबाई आल्या."

मी बाहेर डोकावलं. अप्पांच्या खोलीच्या बाहेरच्या दाराशीं एक पोक्त वयाच्या बाई हमालाकडून आपली ट्रंक वळकटी आंत घेत, त्याला मजुरीचे पैसे देत होत्या.

आत्याबाई !——हा धूमकेतू एकाएकीच उगवला होता. पत्र किंवा निरोप कांहीच नव्हतं.

बाईंचं वय असावं पंचावन्नच्याहि पुढं. रूप सामान्य, पण वागणं, बोलणं, हातवारे करणं सार नाटकी, नाचरेपणाचं. वस्त्रप्रावर्ण तशींच. वयाच्या पोक्तपणाला कांहीच शोभण्यासारखं नव्हतं. अप्पांच्याबरोबर ओरडत बोलत व राजाभाऊंच्या नांवाचा गजर करीत त्या मधल्या घरांत आल्या. जाऊबाईंनी पुढं येऊन कृत्रिमपणानं हसत त्यांचं स्वागत केलं.

आत्याबाईंनी मधु-माधवीला खमाटलं, त्यांचं भरपूर कौतुक केलं आणि त्यांचे मटामटा पापे घेत झोपाळ्याचा आश्रय घेतला. मग त्यांची कृपादृष्टि माझ्याकडे वळली. जाऊबाईंनी माझी ओळख करून देत, मला नमस्कार करण्याविषयी खुणवलें.

पाय पुढं पसरीत व मधु-माधवसिह मागंपुढं डोलत आत्याबाई म्हणाल्या, "मला नमस्कार ?——कशालाहो. तुम्ही शिकलेल्या पगार मिळवणाऱ्या !— आम्ही काय, आहों आपले निरक्षर पंडित !——होय की नाही मध्या—— पण मध्या, लेका काकांनी बायको बघ कशी फटाकडी मिळवलीय ! आणि तुझा म्हणत काय होता. आम्हाला लग्नच करायचं नाही—" आणि हें

बडबडत त्यांनी योग्य तो अभिनय केला आणि त्या पोराचे पुन्हा पापे घेऊन त्याला सतावले!—मी स्वतःशीं नवल करीत व जाऊबाईंच्या तोंडाकडे पाहत तेथून सटकलें.

बाई मधु—माधवीला दटावीत म्हणाल्या, “ हं—आत्याबाईंशी प्रेम मग उठा,—शाळेची तयारी करा नी पानं घ्या. चला, उठा—”

आत्याबाई बसविलेल्या दातांची सुंदर कवळी दाखवीत म्हणाल्या, “ जा —पाखरांनों, आईची आज्ञा पाळा—आत्याबाई आता दिवाळी करून जाणार आहेत. ”

मला वाटतं वरील एवढ्याशा चुटक्यानं आमच्या वन्संचं चित्र वाचकांना स्पष्ट कळून येईल. जाऊबाई नी आमच्या या वन्सं यांच्या स्वभावांत व एकूण आचारविचारांत छत्तीस आंकडाहि कमी पडेल इतका विरोध होता!—आणि कोणताहि सुगावा न लागू देतां वन्सं एकदम प्रगट झाल्या होत्या, पंधरा दिवसाचा मुक्काम करण्याच्या प्रतिज्ञेनं. अर्थात् विजेचा दाब किती व्होल्टचा असेल हें काय सांगावं?—फारसं शुभप्रद नव्हतंच!

रात्रीं यांना मी म्हटलं, “ या आलेल्या वन्सं तुमची सख्खी बहीण नव्हे म्हणतात. (त्यांचा नकार) मग या कुणाच्या कोण? ”

“ आमच्या एखाद्या चुलत्याच्या त्या आहेत— ” ते गंभीरपणाचं सोंग आणीत म्हणाले, “ वाटेल त्या वेळीं आमच्याकडे येण्याइतपत त्या आम्हाला जवळच्या आहेत नी हा फेरा न येतां तर बरा, असं आम्हांला मनांतून वाटण्याइतपत त्या लांबच्या आहेत!— या भानगडीमुळं उभयपक्षीं नातं मानणं भाग पडतं. ”

“ या नेहमी कुठं असतात? — ”

“ बहुशः स्वतःच्या सत्तेच्या घरीं नसतात— ”

“ म्हणजे? ”

“ यांचं कोणाशीं न पटणं हा यांचा मोठा गुण आहे. ” हे म्हणाले,

" महिन्यांतून पांच दिवस प्रेमांत असणं आणि पंचवीस दिवस भांडत बसणं असा यांचा कार्यक्रम आहे. "

" छान ! — यांचीं नात्याचीं माणसं तरी कोण आहेत ? "

" बहुतेक सारीं —" हे म्हणाले, " नवरा आहे. वयांत आलेले मुलगे व मुली आहेत. सुना आहेत, जावई आहेत, नातवंडं आहेत. आत्याबाई तशा भाग्यवान् आहेत. फक्त त्यांचं कुणाशींहि पटत नाही, एवढी जगाची चूक— "

" आपल्या इथं त्या पंधरा दिवस राहणार आहेत म्हणे— " मी सभयतेनं म्हटलं, " कसं जमायचं हें — "

" देव त्यांचं कल्याण करो ! — आपलं सर्वांचं रक्षण करो ! — आपण पामर काय करणार ? "

" तुमचा विनोद पुरे — " मी झणकाऱ्यांत म्हटलं, " मी कसं वागायचं तें सांगा ! — जाऊबाई मला वडील. आलेल्या वन्सं त्याहि वडील. दोघींचं कोठवर जमेल, याची मला मोठी शंका आहे. त्या दोघींच्या भांडणांत माझा चेंदामेंदा व्हायचा— "

" छेः ! इतकं भिण्याचं कारण नाही. " हे म्हणाले, एवढीं मोठीं दोन महायुद्धं झालीं — पण युरोपांत स्विट्झर्लंड अगदी न्यूट्रल् राहिलं. "

" अहो पण न्यूट्रल् राहतां आलं पाहिजे ना — " मी आलेलं हसं दाबीत म्हटलं, " पुष्कळदा इच्छा नसतांहि शेजारचीं राष्ट्रं युद्धांत ओढलीं जातात. त्याची काय वाट ? "

" काढायची पळवाट— " हे म्हणाले, " नाही जमलं पळायचं माहेरीं. दिवाळी जवळ आलीच आहे. माहेर हाकेवर आहे. — अन् हे बघ मौनं सर्वत्र साधनं— "

यांचं बोलणं पटण्यासारखंच होतं. तरीपण मी थोडी विचारांत पडले. तेव्हा हे माझ्या पाठीवर थाप मारून म्हणाले, " उगीच गोंधळूं नकोस.

खव्याळ माणसाशीं संबंध येणं, उणींदुरीं प्रश्नोत्तरं देण्याघेण्याची पाळी उद्भवणं अन् कांही अप्रिय गोष्टी कराव्या लागणं इत्यादि प्रकार या सांसारिक जीवनांत चालायचेच. एवढ्या तेवढ्या गोष्टीला आपण महत्त्व देत गेलों तर जगणं अशक्य होईल. — आणखी एक ध्यानांत घेण्यासारखी गोष्ट. आमच्या वहिनी म्हणजे तुझ्या जाऊबाई तुला ढालीप्रमाणं उपयोगी पडतील. तुला तशी काळजी करण्यासारखं कांही नाही."

चार दिवस कसे तरी गेले. कसे तरी म्हणण्याचं कारण आत्याबाई ऊर्फ वन्सं यांचं वास्तव्य होय. आपण नात्यांत पण परघरीं आहों, याचं त्यांनी स्मरणच ठेवलं नव्हतं. कामाला हात लावायचा नाही. मनांत आलं कीं, चहा करून मागायचा. गुळाचा व कसाहि करून दिला तरी तो ढोसायचा. मधु-माधवींचे उगीच लाड करायचे अन् त्यांना मोकळं सोडायचं नाही आणि श्यामेसारख्या वयांत येऊं पाहणाऱ्या मुलींची विवाहविषयक अनुचित चेष्टा करायची असा त्यांचा क्रम सुरू झाला. जाऊबाईंना हा प्रकार आवडणं शक्यच नव्हतं. त्यांनी दुसरेच दिवशीं त्यांना बजावलं, "मुलांचे भलते लाड करूं नका अन् त्यांना जवळ घेत जाऊं नका. मला तें मुळीच आवडत नाही."

त्यांनी आपल्या मुलांनाहि तसंच बजावलं व आत्याबाईंच्याजवळ बिलकूल जायचं नाही, अशी ताकीद दिली. दुसरी एखादी शहाणी बाई असती तर ती थोडी वरमली असती. थोडी जपून वागली असती. आत्याबाईंनी भ्याल्याचं सोंग करीत, भुवया उंचावत व मान हलवीत "चुकलं! चुकलं! — वहिनी काय आहेत! आग ग बाई!" असं कांही बडबडल्या.

यानंतर त्यांनी एके दिवशीं माझ्याविषयी प्रेम दाखविलं. मला त्या हळूच म्हणाल्या, "हें बघ कुमूद, न्हाणीघरांत तो बाजूचा कोनाडा आहे ना, त्यांत तुपांत कालविलेली सुंठसाखरेची गोळी ठेवलीय् एका

वाटींत. मुकाट्यानं तोंडांत टाकायची नी वाटी धुवून टाकायची. गुपचुप! —" एवढं बोलून त्यांनी लाडिकपणानं माझा गालगुचा घेतला! — घनःश्याम नयनीं आला — ही ओळ गुणगुणत स्वारी एका आरश्याजवळ गेली!

मी स्तंभित झालें. भांबावून गेलें. जाऊबाईंच्या हें लक्षांत आलं तर? आपल्याविषयी त्यांना संशय आला तर?—पन्नासच्या पुढं गेलेल्या या बयेला हा साधा पोच कसा नाही? तिच्यापुढं जाऊन तिच्या दोन मुस्कटांत ठेवून द्याव्या असा मला राग आला. अंग धुण्यास न्हाणीघरांत जाणं मला भाग होतं. अस्वस्थ मनानं मी तिकडे गेलें. सुंठसाखरेच्या वाटीकडे ढुंकूनहि पाहायचं नाही, असं मी ठरवून टाकलं.

पण धन्य आमच्या जाऊबाईंच्या काकदृष्टीची! — मांजरानं डोळे मिटले होते; गृहिणी फुंकणी घेऊन तयार होती! — मी न्हाणीघरांत डोकावणार तों दाराशींच जाऊबाई उभ्या, ती वाटी घेऊन! संताप व तुच्छता त्यांच्या मुद्रेवर पसरली होती. मी एकदम थिजलें. माझा अपराध कांहीच नव्हता. तरी जाऊबाईंनी वाटी दाखवीत म्हटलं, "आवडत्या वन्संनी आपल्या छोट्या वहिनीसाहेबांच्याकरितां ही बाळवाटी अशी बाजूला आणून ठेवलीय वाटतं?"

त्यांचं हें टोचून बोलणं मला उद्देशून होतं, असं मुळीच नाही. मी सौम्यपणानं उत्तर देऊं शकलें असतें. पण मला तें साधलं नाही. मी जरा उंच स्वरांत व रागांत म्हटलं, "हें पाहा, मला उगीच घालून पाडून बोलूं नका अं. साफ सांगतें. या चाखटपणांत माझं एवढंहि अंग नाही."

"तें मला माहीत आहे ग —" जाऊबाई रुक्षपणें म्हणाल्या, "पण तुला असं तुटक उत्तर देण्याचं कारण नाही."

बाई चटकन् बाहेर गेल्या. मी पाणी काढून, दार पुढं केलं व अंग धुण्यास बसलें.

इकडे बाहेर जाऊबाई – वन्सं यांच्या भांडणाला तोंड लागलं. वन्संनी सफाईनं सांगून टाकलं, "कुमुदनं सुंठसाखर खाण्याची इच्छा दाखविली. दिली तिला कालवून —"

"मला विचारल्यावाचून ती असं मुळीच म्हणायची नाही." बाई म्हणाल्या, "मी घरांत जिवन्त आहे ना?" •

"तिचा हक्क नाही वाटतं? — ती दरमहा दोनशें रुपये मिळवतेय्. ती तूपसाखर खाईल, नाही तर उपाशी राहिल —" वन्संनी तारे तोडले. "तुला त्यांत काय विचारायचंय्."

यानंतर युद्धाला चांगलंच तोंड लागलं. वन्संनी भात्यांतला महत्त्वाचा बाण काढला. जाऊबाईंचा मुलांशीं असणारा सावत्रभाव. 'तूं जावेचा उभा छळ चालविला आहेस'— असाहि त्यांनी आरोप केला. मग काय विचारतां? — जाऊबाई वाघिणीप्रमाणं चवताळल्या! "मी माझ्या मुलांना वीष घालून जिवं मारीन! तूं कोण बोलणार? माझ्या जावेला वेतानं फोडून काढीन —"

"त्या आधी ती वेगळी निघेल." वन्स म्हणाल्या, "तुझ्या नाकावर टिच्चून मी तिला वेगळं राहायला लावतें कीं नाही बघ. तूं काय समजलीस!"

"तूं भांडकुदळ अवदसा – आलीस कशाला इथं मरायला! – आंताच्या आता हो चालती माझ्या घरांतून —"

चारी मुलं व मी तटस्थ बसून राहिलों. अप्पा व हे कोणत्या मनःस्थितींत होते, कोण जाणे!

माझ्या पुढच्या आयुष्यांत या दिवसाला महत्त्व आलं.

— ५ —

## मधला दीड वर्षांचा काल

डोंगर माथ्यावर असलेला एखादा किल्ला किंवा एखादं देवस्थान पाहायला जायचं असलं म्हणजे मनाला मोठा हुरूप वाटतो. वर गेल्यावर किती मजा येईल, माथ्यावरून खालचा भूभाग किती सुंदर दिसेल आणि वरच्या शुद्ध मोकळ्या हवेची किती गंमत वाटेल इत्यादि आनंददायक विचार आपण मनाशीं करतों. मित्रमंडळींतहि बोलतो. पण हा उत्साह कोठवर? प्रत्यक्ष त्या डोंगराच्या पायथ्याशीं जाईपर्यंत. एकदा तिथं गेलों अन् पर्वताचं तें उंच शिखर आकाशांत गेलेलं पाहिलं कीं छाती दडपते. त्यांत ती चढण अगदी सरळ कड्याची अपरिचित असावी. भीतीचा व आश्चर्याचा धक्का बसतो आपल्याला. वाटतं: आपल्याला झेपणार नाही ती चढण. — परंतु त्यावेळीं माघार घेणंहि शक्य नसतं. दुर्बलतेची आपली आपल्याला लाज वाटते. धैर्य धरून व मोठं अवसान आणून आपण चढूं लागतों.

— आणि काय चमत्कार! दमछाट होत असतांहि पंधरा वीस मिनिटांत आपण कितीतरी चढून जातों. एक टप्पा झाला! — आपण स्वतःला धीर देतों. डोंगरमाथा अद्यापि उंच वाटतो. छेः बसायचं नाही. धिमे धिमे वरची चाल! आपण स्वतःला बजावतों. दीर्घश्वास घेऊन चढूं लागतों.

पुन्हा कांही काळ जातो. आतां खूप दमणूक झालेली असते. पाय

खूप भारावतात ! — नको आतां चढणं ! – सुस्कारा टाकीत आपण खालीं पाहतोंः तीन चतुर्थांश डोंगर पायथ्याशीं गेलेला असतो आणि वर पाहावं तोंः डोंगरमाथा अगदी आटोक्यांत आल्याप्रमाणं दिसतो ! — बस्स् ! एक झपाटा मारला की, माथ्यावर ! नव्या दमानं — नव्या उत्साहानं — आपण पाऊल उचलतों !

डोंगर चढणीचं हें वर्णन मी कां केलं ? — माझ्या T. D. च्या प्रयत्नाची अवस्था सांगण्याकरितां ! — अभ्यास करणं नी परीक्षा देणं या गोष्टी मला कांहीं अगदी नव्या नव्हत्या. मनाला काळजी वाटेल, कसं जमतं ? काय होतं ? अशी हुरहूर लागेल या धर्तीनं मी यापूर्वी तीन परीक्षा—सामान्यच — दिल्या होत्या. पण त्यावेळीं मी केवळ विद्यार्थिनी होतें. अभ्यास करण्यापलीकडे जबाबदारी नव्हती. पण आज निराळी परिस्थिति होती.

हो, मला कृतज्ञतेनं सांगितलं पाहिजे कीं जाऊबाईनी मला गृहकृत्यांचा भार मुळीच वाटूं दिला नाही. उलट, माझा अभ्यास अगदीं निर्वेध चालेल, अशी दक्षता घेतली आणि अगदी मातृवत्सलतेनं मला प्रोत्साहन दिलं. त्याचप्रमाणं यांचं साह्य मला अमाप झालं. असं असतांहि मला पहिल्या पहिल्यांदा नको तो अभ्यास, नको ती परीक्षा असं वाटलं. परीक्षेंत यश येणं कठीण आहे, ही चिंताहि मनाला मधून मधून लागली.

पण शेवटीं कालानं चमत्कार दाखविला. माझा अभ्यास सुरळीत व चांगला झाला ! एके दिवशीं मला कळलंः मी T. D. झालें म्हणून !

याच आनंदांत आणखी आनंद म्हणजे हे LL. B. झाले. सनदहि मिळाली त्यांना !

दीड वर्षाचा काल हां हां म्हणतां गेला. शिक्षिका म्हणून माझी योग्यता वाढली. त्या मानानं पगारहि वाढला. एका विशेष प्रतिष्ठेनं मी समाजांत वावरूं लागलें. गांवांतील प्रमुख महिला मंडळाची चिटणीस, बालिका

क्रीडामंडळ नांवाच्या संस्थेची अध्यक्ष अन् अशाच एका नव्या संस्थेतील स्त्रीशाखेची सल्लागार असे हुद्दे क्रमानं माझ्याकडे आले.. सभा सम्मेलनाचीं आमंत्रणं स्वतंत्रपणें माझ्या नांवें येऊं लागलीं! — मी थोडंफार वक्तृत्वहि गाजवूं लागलें.

मनाला लागणारी एकच गोष्ट घडली होती. बाबांची बदली झाल्यामुळं गांवांतल्या गांवांत असलेलं माहेर दूर झालं होतं. बाकी माझं भाग्य वाढतं होतं. बायकी भाषेंत सांगायचं म्हणजे सारं कांही उदंड होतं. जीवनांतील गोडी अवीट होती. याबरोबर कांही वेळानं त्याच गोडीला थोडा आंबूस वास येऊं लागावा, असाहि एक क्रम आहे, नाही का?

हा वास मला मोठ्या चमत्कारिक रीतीनं आला.

आमच्या जाऊबाईंनी पूर्वीपासूनच एक नियम ठरवून टाकला होता. आठवड्यांतून एक दिवस मी सैंपाकाचा सबंध भार उचलायचा. त्यावेळीं त्या स्वतः अगदी बाजूला राहात. आवश्यकता पडली तर श्यामा माझ्या हाताखालीं येई.

आठवड्यांतून एक दिवस पाकसिद्धीचं काम माझ्याकडे येई यांत गैर कांहीच नव्हतं. माझा त्याला नकार नव्हता. मी तें अगदी आनंदानं व सुगरणपणानं करीत असे. भाऊजी उर्फ अप्पा माझ्या सैंपाकाला खूप नांवाजत आणि हे सर्वांसमोर प्रत्येक पदार्थासंबंधीं कांही खोड काढीत विनोद करीत असत. जाऊबाईंनी चापलं म्हणजे स्वारी गप्प व्हायची. मला भलेपणा — शाबासकी — मिळायची ती एकान्तीं! — असो.

एका संध्याकाळीं मी अशीच सैंपाकाला लागलें होतें. ताई आपल्या चारी मुलांना घेऊन कांही देवाचं म्हणून घेत होत्या. मी आपल्या कामांत अगदी मग्न होतें. अर्थात् बाहेरच्या बोलण्याकडे माझं फारसं लक्ष नव्हतं. तें एका प्रसंगानं गेलं. कांही कामाकरितां मी श्यामाला पुकारलं. ती तात्काळ आली पण तोंड वेंगाडून म्हणाली, "काकू, ताई आम्हाला एक सुंदर गोष्ट

सांगतेय्. तेवढी ऐकून येऊं का? — अगदी लहान आहे गोष्ट. येऊं का ऐकून?" — मी हसत तिच्याकडे पाहिलं. तिला रुकार दिला. ती पळून गेली. मी उठून मला काय पाहिजे होतं तें घेतलं. माझं काम चालू राहिलं. पण ताई गोष्ट कसली सांगत असतील? – या जिज्ञासेनं मी बाहेर लक्ष ठेवलं.

ताईंनी गोष्ट खुलवून सांगितली. मुलांनीं मधूनमधून प्रश्न करीत ती ऐकली. मला सारांश कळला तो असा —

## ढगाशीं टक्कर घेणाऱ्या एडक्याची गोष्ट

एक मोठा मस्तवाल एडका होता. तो टकरा खेळण्यांत मोठा वस्ताद होता. दुसऱ्या अनेक एडक्यांशीं टकरी मारून त्यानं मोठं यश मिळवलं होतं. एकदा तर त्यानं एका बैलाशीं झुंज घेऊन त्याला पळवून लावलं होतं. यामुळं त्या एडक्याला मोठा गर्व झाला. समोर कांही उंच धिप्पाड दिसलं की, त्याला धडक मारायची असा त्याला छंद लागला.

एकदां त्याला भेटला एक कोल्हा. एडक्यानं त्याला युद्ध खेळण्याचं आव्हान दिलं. कोल्हा मनांत हसला पण बाहेरून भ्याल्यासारखं दाखवून म्हणाला, "एडकेदादा, मी गरीब प्राणी. माझ्याशीं कसली कुस्ती खेळतां. तो समोर डोंगर आहे. त्याच्या डोक्यावर तो मोठा ढग बसला आहे तो पाहा. त्याला टक्कर मारून खालीं पाडलंत तर मी तुमची शहामत मानीन. — येतां? — मी वाट दाखवतों."

एडक्यानं ढगाकडे पाहिलं, तो त्याला एवढासा दिसला. गर्वानं फुगलेला एडका कोल्ह्याला म्हणाला, "हें पाहा कोल्हेदादा, त्या ढगाला मी एक धडक दिली की तो कोसळून डोंगरावरून खालीं कोसळेल. तेव्हां मी त्या ढगाला तर पाडतोच. पण तिथं जें आभाळ टेकलं आहे ना त्यालासुद्धा भगदाड पाडतों. चल दाखव मला वाट."

कोल्हा स्वतःशीं हसत पुढे झाला. एडका त्याच्या मागोमाग गेला, दोघेहि डोंगर माथ्यावर गेले. एडक्यानं पाहिलं : ढग उंच व आभाळ तर

त्याहून उंच. कोल्हा म्हणाला, "हं एडकेदादा, द्या टक्कर! — जरा मान उंच करा आणि हुंदडा!"

ढग व आभाळ उंच आहे हें एडक्याला स्पष्ट दिसत होतं. पण आपण टक्कर घेतली नाही तर कोल्हा आपल्याला हसेल. आपला बोज राहणार नाही. असं त्याला वाटलं. म्हणून त्यानं वर दिसणाऱ्या आकाशाला ढुशी देण्याचा पराक्रम केला! — आणि त्या गडबडींत त्याचा तोल जाऊन तांच डोंगरावरून खाली गडगडला! कोल्हा खे खे हसत जवळच्या जंगलांत पळून गेला.

एडका लंगडत व कण्हत गांवांत परत आला!

— छी:, काय गोष्ट! — मी मनाशीं म्हटलं. 'गर्वाचं घर खालीं' असं कांही तत्त्व मुलांना सांगण्याचा ताईंचा हेतू असावा. पण गोष्ट कांहीं तितकी समर्पक नव्हती. मला तर ती अगदी पोरकट वाटली. माधव व श्यामा आता लहानांत मोडत नव्हती. माधव मॅट्रिकमध्ये होता. श्यामा इंग्रजी पांचवींत होती. अशा प्रौढ मुलांना ही गोष्ट सांगायची? — छी: अगदीच पोरकट!

मी त्या गोष्टीला तुच्छ लेखत भाकऱ्या करूं लागलें. — अन् कां कोण जाणे, माझ्या मनांत एकदम आलं: तीं गोष्ट – गोष्ट नव्हे. तो एक टोमणा आहे व तो आपल्याला उद्देशून आहे!

कांही क्षण तरी मी तटस्थ झालें. स्वतःला म्हटलं, "आपल्यासमोर — आपल्याला ऐकूं जाईल असं ताई बोलल्या का? — नाही. मग तीं गोष्ट आपल्याला उद्देशून आहे असं कां मानायचं?"

पण नाही – संशय हा झोटिंग महा.

यांना मिळालेली वकिलीची सनद, माझं टी. डी. चं यश, वाढता पगार नी वाढता नांव लौकिक – मला ग ची बाधा झाली होती का? – आपण कोणी आहोंत! – विशेष आहोंत! योग्यतेच्या आहोंत! असं मला वाटूं

लागलं होतं का? – नाही असं ठासून म्हणणं मोठं कठिण आहे! – मी मनुष्य होतें! – त्या वेळीं मला आत्मपरीक्षण करतां आलं नाही. मी त्या भानगडींतहि पडलें नाहीं. पण त्या कालाकडे आता पाहिल्यावर वाटतं — जाऊं दे. चालू कथनांत खंड नको.

एडक्याची गोष्ट मला उद्देशून आहे, या विषयी माझी मी खात्री पटवून घेतली! – माझ्या चढेलपणाला चिमटा बसला! – 'असं काय?' असा गुरगुराट अंतस्थ सुरू झाला.

सगळीं कामं उरकल्यानंतरची गोष्ट. जाऊबाई मला सुपारी देत असतां मी एकदम म्हटलं, "काय हो ताई, मघा तुम्ही मुलांना एडक्याची गोष्ट सांगितलीत? – ती कोणाला उद्देशून होती?"

"हं! – कां बरं?"

"मला सध्या ताठा आला आहे, असं तुम्हांला वाटत असलं पाहिजे." मी किंचित् चिडक्या स्वरांत म्हटलं, "अन् माझे कान उपटण्याकरितां ही एडक्याची गोष्ट तुम्ही बनवून सांगितलीत अशी माझी खात्री आहे —"

बाई किंचित् हसल्या. विचलित न होतां त्या म्हणाल्या, "त्या गोष्टीकडे तुझं एवढं लक्ष होतं? – नवल आहे –"

"नवल कसलं? –" मी एकदम म्हटलं, "मला उद्देशून सांगितलेली गोष्ट मला कां न कळेल?"

"बरं – मग पुढं काय म्हणणं तुझं?" ताईंनी शांतपणें विचारलं.

मला कांही बोलतां येईना. पण माझा राग वाढला. तेव्हां ताई म्हणाल्या, "हें पाहा कुमूद, एडक्याची गोष्ट तूं आपल्याकडे ओढून घेतेस – छान! – मी एवढंच म्हणेन. होय. ती गोष्ट मी तुझ्याकरतां रचली! – थोडा विवेक

कर. माझ्या या बोलण्यावर खूप खूप रागाव. मनांतून वाटल्यास शिव्याहि दे. पण तूं बोलणं काढलंस म्हणून सांगतें. डोकं आकाशांत नेऊं नकोस. आकाश फार–फार उंच आहे.–लोकांनी मोठं म्हणावं, ही गुणाची खरी किंमत; पण स्वतःच स्वतःला मोठं मानूं लागावं ही घसरगुंडी होण्याची पहिली खूण! – काय समजलं? — ”

त्या माझ्यापुढून निघून गेल्या. मी तोंडांत मारल्याप्रमाणं माडीकडे वळलें! — मन विकल्पाच्या चक्रव्यूहांत शिरलं!

“जाऊबाईंना माझ्या मोठेपणाचा हेवा वाटूं लागला तर?” या पायावर V आकाराची इमारत उठूं लागली!

धुसपुसत मी माडीवर गेलें. यांच्यांशीं शब्दहि न बोलतां अंथरुण गाठलं, मुस्कट मारून पडलें.

हे टेबलाजवळ बसून कांही टिपणं काढीत होते. माझी रोजची रीत म्हणजे खुर्चीच्या पाठीशीं जाऊन त्यांच्या अंगावर वाकायचं. त्यांचं लेखन पाहायचं नी माझ्या सैंपाकाला त्यांनी जीं नांवं ठेविलीं असतील त्याचं उट्टं काढायचं! — आज तो खंड पडलेला पाहतांच यांनी खुर्ची न वळवतांच म्हटलं, “काहो वकिलीणबाई आज लौकर झोपणार? — प्रकृति ठीक ना?”

“मला कांही धाडसुद्धा झाली नाही — ”

“आनंदाची गोष्ट आहे — अभिनंदन!” ते जवळ आले. चिकटून बसले. “रुसवा कां? –– खंडणी कशाकरितां?” त्यांनी विचारलं. मी त्यांचा हात झिडकारीत कुशीला झालें.

“राजाभाऊ — ” हे उद्गारले, “गड्या आज तुझी धडगत नाही. कोर्टांत फर्डेशाही वकिली गाजवशील, पण इथं घरांत हॅः! टी. डी. झालेल्या बायकोला खूष करणं तुला नाही साधायचं! — नाही साधायचं!”

त्यांनी मलां पुन्हा चुचकारण्याचा प्रयत्न केला. मी त्यांचा हात झिडकारीत उठून बसलें नी फिस् फिस् करीत म्हटलं, "पांचटपणा पुरे. — केव्हां तरी पुढं मागं स्पष्ट बोलावं लागणारच आहे. म्हणून सांगतें : या पुढं आपल्या संसारांत माझं नी जाऊबाईंचं पटेल असं मला वाटत नाही. तुटेपर्यंत ताणण्यांत अर्थ नाही. या दृष्टीनं काय विचार करायचा असेल तो करा— "

ते पटकन् मजजवळून उठले. माझ्या रागीट मुद्रेकडे त्यांनी कांही क्षण पाहिलं. मला तें पाहणं रुचलं नाही. मी मानेला झटका देऊन निषेध केला. नंतर किंचित् नरमाईनं म्हटलं, "आजच निकाल केला पाहिजे असं नाही. पण वस्तुस्थिति तुम्ही ध्यानीं घेतली पाहिजे. मागाहून म्हणाल अगोदर कां बोलली नाहीस म्हणून. काय समजलं ?"

"समजलं की — आपणाला वेगळं झालं पाहिजे." ते खवचटपणें म्हणाले, "मग चांगल्या गोष्टीला उशीर कां करायचा. — मला वाटतं, उद्याच्या उद्या आपण याचा निर्णय घेऊं. — निर्णय काय घ्यायचा ? — चटकन् वेगळं व्हायचं. आहे काय नी नाही काय !"

"तुम्हांला शोभत नाही हें बोलणं." मी ओठ चावीत म्हटलं, "तुमचं हें नेहमचिं आहे ! बायको म्हणजे कोण्या झाडाचा पाला ! — तिच्या मनःस्थितीचा विचारच करूं नका."

"झूट — " ते नाटकी आवेशांत म्हणाले, "माझं माझ्या बायकोवर प्राणापलीकडे प्रेम आहे ! – (माझ्या पाठीवर थाप देत) — प्रिये, हृदयाच्या राणी, प्राणेश्वरी — एका साध्या गोष्टीकरितां तूं इतकं चिंताग्रस्त असावंस — दुःखी कष्टी व्हावंस — धिःकार असो मला ! — थांब, माझं मनोगत पूर्ण होऊं दे. मी प्रतिज्ञेनं सांगतों कीं, आपण जास्तींत जास्त लौकर वेगळं व्हायचं. आतां वहिनीची एवढी पत्रास नको. आपला कार्यभाग झाला आहे ! मी वकील झालों ! तूं टी. डी. झालीस. आतां वहिनींच्या साह्याची

गरज राहिली कुठं ? -- छट् — आपण वेगळं व्हायचंच ! -- पटत नाही तिथं राहा कशाला ? ”

मी कानांत बोटं घालीत म्हटलं, “ किती खड्या सुरांत बोलतां ! -- आणखी किती करणार मला पाण्यापेक्षा पातळ ? तुमचं मनोगत स्पष्ट कळलं ! — माझं प्राक्तन मला भोगलं पाहिजे हें खरं — ” मी पुन्हा मुस्कट मारलं.

हे मुकाट्यानं पुन्हा टेबलाजवळ गेले नी पुस्तक चाळूं लागले.

— ६ —

## ऐका देवा, घड्याळाची कहाणी

आटपाट नगर होतं. तिथं एक कुटुंब होतं. आनंदांत नांदत होतं. त्यांत दोन जावा होत्या. एक होती धाकटी. दुसरी होती थोरली. थोरली संसार पाहत होती. धाकटी मिळवती होती. भांडण व्हायला कांही कारण नव्हतं. दोघीहि जाणत्या व सुस्वभावी होत्या. पण त्यांचं पटेना. थोरली म्हणाली, मी घरांत प्रमुख. माझ्या इच्छेवाचून घरांतलं पान हलायचं नाही. धाकटी म्हणाली, मी आहे शिकलेली, माझा मान बरोबरीचा. मी कह्यांत राहायची नाहीं. अशा दोघी कुरबुरत राहिल्या. आपसांत राग करूं लागल्या.

चैत्राचा महिना होता. सुट्टीचा दिवस होता. थोरली जाऊ झोपाळ्यावर कांही वाचीत बसली होती. तोंच धाकटी जावेजवळ आली. थोरलीनं धाकटीला आपल्याजवळ जागा करून दिली.

... ... ... ...

एक कागदी लांबडी पेटी उघडीत मी जाऊबाईच्या पुढं धरली नी किंचित् ऐटींत म्हटलं, "ताई, हें रिस्ट वॉच पाहिलंत. यांच्याकरितां आणलंय्— "

बाईंनी पेटी हातांत घेतली. कौतुकानं घड्याळ पाहत त्यांनी म्हटलं, "यांच्याकरितां ! — म्हणजे ! "

मी मनांत किंचित् रुसलें. पण तें बाहेर न दर्शवितां थोडं उमेटपणानं म्हटलं, "यांच्याकरितां म्हणजे तुमच्या भाऊजींच्याकरितां. आम्ही शिकलेल्या मुली नवऱ्याचं नांव चटकन् घ्यायला संकोचणार नाही बरं का —"

"या धीटपणाबद्दल मी माझ्या धाकट्या जावेचं मनापासून कौतुक करीन —" ताई हसत म्हणाल्या. त्यांनी घड्याळ काढून पाहिलं. पुन्हा पेटींत ठेवलं. पेटी मांडीखालीं ठेवली.

त्यांचं तें वर्तन मला आवडलं नाही. मी उगीच हसलें व म्हटलं, "घड्याळ छान आहे नाही का?"

"असेल ना —"

"या आठवड्यांत यांचा वाढदिवस आहे." मी म्हटलं, "मी त्या दिवशीं त्यांना ही प्रेमाची भेट देणाराय् —"

"कौतुकाची गोष्ट. केवढ्याला पडलं घड्याळ?"

"फार मजा आहे, त्या खरेदीची." मी अभिमानानं म्हटलं, "साक्रीकरबाई आहेत, त्यांच्या धाकट्या भावानं या गांवांत येऊन घड्याळं विकण्याचं व दुरुस्तीचं दुकान काढलंय्. या पाडव्याला मुहूर्त केला त्यानं. — हें घड्याळ आहे शंभराचं. सध्या मी फक्त दहा रुपये दिले आहेत. बाकीचे नव्वद दरमहा दहाप्रमाणं नऊ महिन्यांत फेडायचे —"

"म्हणजे ही प्रेमाची भेट तूं उधार आणली आहेस म्हणायची?" बाईंनी गंभीर होत प्रश्न केला, "अन् हा सारा कारभार तूं मला न विचारतां केलास?"

मी मनांत चरकलें. आपलं कांहीतरी चुकलं असं मला आंतून वाटलं. पण तें कबूल कसं करायचं? — मी स्वतःवर रागावलेंच. पण जाऊबाईवर जास्त रागावलें. मी एकदम उठलें, म्हटलं, "आणा तें घड्याळ इकडं. मी पाहून ठेवलं आहे. मी केलेल्या कोणत्याहि गोष्टींत कांही खोड काढायची नी माझा पाणउतारा करायचा —"

"आरोप खोटा — "

"घड्याळ द्या इकडं — "

"मिळायचं नाहीं — "

"मिळायचं नाही?" मी रागानंच पण नवल करीत विचारलं, "कां? —"

"घडलेला सारा प्रकार मला पसंत नाही — "

"मला कुक्कुबाळ का समजतां?"

"मुळीच नाही — " जाऊबाई म्हणाल्या, "फक्त सरळ व भाबडी आहेस. तुला चूक करूं न देणं हें माझं कर्तव्य आहे. तें मला पार पाडलं पाहिजे."

मला लहानपणा देण्याचा त्यांचा हा खटाटोप मला मुळीच आवडला नाही. माझ्या रागाचा पारा कांही अंशानं वाढला. फडाफड उत्तरं देऊन त्यांना चुप्प बसवावं, असंहि मला भारी वाटलं. पण जाऊबाईंच्या वरील शांत बोलण्यावर मला चटकन् उत्तर देतां येईना. तेव्हां जाऊबाईच पुढं म्हणाल्या, "घड्याळ आणण्याच्या या प्रकारांत तूं अजाणतेपणानं तीन चुका केल्या आहेस. — पहिली — आवश्यकता पाहिली नाही. सध्या भाऊजींच्याजवळ घड्याळ आहे. तें जुनं आहे व खिशांतलं आहे हें मला मान्य आहे. तें म्हणावं तितकं अचूक वेळ दाखवीत नाही, हें मी जाणतें. त्यांना आतां हातांत बांधायचं घड्याळ मिळालं तर तें विशेष शोभून दिसेल, हेंहि मला मान्य आहे. पण त्या वाचून आज अडतंय् का? — नाही हें सरळ उत्तर आहे. —"

"तुमच्या दृष्टीनं फार फारच सरळ आहे," मी खवचटपणानं म्हटलं, "पण माझ्या व त्यांच्या कांही आवडीनिवडी आहेतच. घड्याळ आणण्यांत माझं कांही चुकलेलं नाही आहे— "

"मग तूं तें उधार आणायला नको होतंस — " बाई गंभीरपणानं

म्हणाल्या, "उधारीचा व्यवहार नेहमीच आंतबट्याचा असतो. म्हणून ही दुसरी चूक पहिल्या चुकीपेक्षांहि मोठी आहे."

"पण आमच्या मैत्रिणींत दोघींनी असा व्यवहार केलेला आहे. त्याहि मूर्खच का?"

जाऊबाई उपहासानं हसल्या व म्हणाल्या, "दुसऱ्याचं शहाणपण मी कशाला काढूं म्हणा. पण तूं मेंढराप्रमाणं वागलीस असं मला म्हणतां येईल. अन् त्यामुळं तुझ्या दुसऱ्या चुकीला आणखी मार्क द्यावे लागतील — "

"फारच छान! – आता तिसरी चूक कळूं दे. म्हणजे मला जायला बरं — "

"मला विचारल्यावाचून हा सारा कारभार केलास ही तिसरी चूक – " जाऊबाई शांतपणें म्हणाल्या.

"म्हणजे या घरांत मला स्वातंत्र्य कांहींच नाही म्हणायचं!" — मी ताठ्यानं प्रश्न केला, "प्रत्येक गोष्ट तुमच्या विचारें झाली पाहिजे असंच ना! — "

"हो. — आपलं तसं ठरलेलं आहे." जाऊबाई निश्चित सुरांत म्हणाल्या, "संसाराचीं सारीं सूत्रं जोंपर्यंत माझ्याकडे आहेत तोंपर्यंत मला विचारल्यावाचून तुला कांही करतां येणार नाही. — या बाबतींत माझे यजमान व भाऊजी कसे वागतात? याची तुला कल्पना आहेच."

"अन् असला हा तुमचा अरेरावी अधिकार मी मानला नाहीं तर? –" मी तिखट शद्बांत विचारलं.

जाऊबाई तटकन् उठल्या. माझ्या तोंडांत लगावण्याची त्यांना उर्मी आली असावी. पण त्यांनी संयम केला. त्या तुटक स्वरांत म्हणाल्या, "उलट उत्तरं करणारी तूं नव्हेस. म्हणून मी या वेळीं तुझी गय करतें. पण ध्यानांत ठेव. माझ्या हाताखालीं राहायचं आहे तोंपर्यंत तुला आपल्या

घरांतील शिस्त मोडतां येणार नाही. पुन्हा असं बोलत जाऊं नकोस. — मी अरेरावी व खाष्ट अशी जाऊ आहे कीं, तुझ्यावर मनापासून प्रेम करणारी तुझी वडील बहीण आहे, याचं उत्तर तूं आपल्या अंतरात्म्याला विचार. जा, मी हें घड्याळ परत करणार न् झालेला व्यवहार तोडून टाकणार समजलीस. जा — माझ्यावर रागावण्यापेक्षा स्वतःला शहाणपण शिकविण्याचा प्रयत्न कर. जा —"

त्या घड्याळाची पेटी घेऊन अप्पांच्या खोलींत निघून गेल्या. मी जळत्या दृष्टीनं त्यांच्याकडे पाहत राहिलें. मी संतापांत असतांहि त्यांच्या बोलण्यांतील सत्य मला नाकारतां येईना. मी जळफळत माडविर गेलें. हे कुठे बाहेर गेले होते. आणि असून तरी काय उपयोग होता? — आधी वहिनी बरोबर. मग बायकोची वास्तपुस्त!

उशीचा कुस्कर करीत मी आपल्या उधाणाला वाट करून देत होतें. त्यांतच एक विचार मधून मधून डाचत होता. जाऊबाईंनी घड्याळ परत करण्याचा आटापिटा केला -- त्या केल्यावाचून राहणार नाहीतच-- तर साक्रीकरबाई काय म्हणतील? त्यांचा घड्याळजी भाऊ काय म्हणेल?— मैत्रिणी काय म्हणतील? — आपण वीरश्रीनं घड्याळ आणलं काय नी खट्याळ — खट्ट्याळ जाऊबाई तें परत करण्याचं ठरवितात काय? — मी माझ्या पतीकरितां तें घेणार. माझ्या पगारांतून पैसे देणार. या देवघेवींत माझ्या या जावेचे काय तीन चव्वल खर्च होतात! — कां तिनं असा मोडता घालावा नी माझा मनोभंग करावा? — मी म्हणे चुकलें! — हो, चुकलें! उधारी आंतबट्ट्याची असते, हो असते! नुकसान कुणाचं त्यांत? — माझं मी पाहून घेईन. -- ही सुडकी कोण मधें येणार! — म्हणे घरांतिल शिस्त बिघडूं देणार नाहीं! नको देऊस! — मी असलीं बंधनं मुळीच पाळणार नाहीं. मग त्यांत माझा प्राण गेला तरी बेहत्तर!"

मी आवेशानं उठून बसलें. घाव घालण्याची इच्छा तीव्र झाली. पण

घाव कुठं व कसा घालायचा? ध्यानांत यइनो. — बरं, मऊपणानं घेऊनं जाऊबाईंना सगळं समजावून सांगितलं तर? — माझ्या हिताला जपण्याची त्यांची आस्था जागृत केली तर? घड्याळ परत केल्यानं माझी होणारी नाचक्की त्यांना लक्षांत घ्यायला नको का? — कारण नसतां उगीच भांडाभांडी कशाला करायची? जाऊबाईंचं उधार व्यवहारासंबंधीचं बोलणं खोटं थोडंच आहे. मी थोडा विचार करायला हवाच होता. घरांतील वडील माणसांजवळ थोडा कमीपणा घेतला म्हणून बिघडलं कुठं?

असा कांही विचार करीत मी बसलें आहे तों जिन्यांत पावलं वाजलीं व यांचा आवाज आला: "या–या घोले. या. — ताई येतील मागाहून."

मी किंचित् चपापलें. "घोले? — घड्याळजी कीं काय? —" मी स्वतःशीं नवल करीत उठलें. संधी सांपडतांच मी खालीं जाण्याच्या तयारीनं राहिलें.

हे वर आले. मागोमाग घोले. एक वृद्ध घड्याळजी. "चहा आणायचा?" मी जिन्याकडे वळत विचारलं.

तितक्यांत ताई ऊर्फ जाऊबाई दारांत दिसल्या. त्यांच्या हातांत घड्याळाची पेटी होती. घोले कां आले असावे? याची मला कल्पना आली. पुन्हा माझं मन एकदम रुष्ट झालं. मी ताईंना बगल देऊन जाऊं लागलें. "कुमूद, जरा थांब. मग दोघीहि खालीं जाऊं —"

मी दुर्बल ठरलें.

ताई पुढं झाल्या. घोल्यांच्याकडे त्यांनी घड्याळाची पेटी उलगडत दिली. त्या म्हणाल्या, "घोले, या धर्तीचं एक घड्याळ आमच्या नव्या झालेल्या वकील साहेबांच्याकरितां घ्यावयाचं आहे."

"माझ्याकरितां घडयाळ? —" हे मध्येच म्हणाले, "माझं एक चुनाळं आहे ना. सध्या नव्याची काय गरज? —"

"माझं बोलणं संपूं दे —" ताई त्यांना दटावीत म्हणाल्या, "मग

तुम्ही बोला भाऊजी —"

"राहिलं! —" भाऊजी लहान मुलाप्रमाणं गप्प बसले! बावळट-पणानं त्यांनी माझ्याकडे पाहिलं. ते उगीचच हसले. त्यांची ही लकब नेहमीची होती. मला या असल्या प्रकारानं राग येतो, हे त्यांना माहीत होतं. सध्या मी कांहीतरी घुश्शांत आहे हेंहि त्यांनी ताडलं होतं.

घोले डोळयाला लावण्याचं यंत्र बाहेर काढीत म्हणाले, "हें घड्याळ सामान्य आहे. घ्यायचं झालं तर चांगल्या कंपनीचं घ्या."

"शंभरापर्यंत घड्याळ असावं —"

"मग हा टाकाऊ माल मुळीच घेऊं नका —"

घोल्यांनी यंत्र डोळयाला लावीत म्हटलं. तें घड्याळ मागच्या बाजूनं खोलून पाहूं लागले. ताईंनी एकवार माझ्याकडे पाहून स्मित केलं.

मला तो प्रकार असह्य झाला. मी तेथून सटकण्याचं ठरवलं. माझा हेतु यांनी ओळखला. ते ओरडून म्हणाले, "वहिनी कुमूदला तुम्ही थांबायला सांगितलंत; पण ती पळून जाण्याच्या पवित्र्यांत आहे."

ताई हसल्या व म्हणाल्या, "तुम्ही दारावर पहारा करा. कैद्याला फरारी होऊं देऊं नका —"

"बराबर!" ते त्वरेनं दाराशीं गेले व दार आडवून उभे राहिले. हा विनोद किती असह्य होता! हें सारं घोल्यांच्यासारख्या तिऱ्हाईत इसमासमोर! — पण तो म्हातारा आपल्या तंत्रींत होता. मी दाराशीं गेलें नी ओठ आवळत म्हटलं, "माझी वाट सोडा मुकाट्यानं."

"हुकूम नाही—" हे म्हणाले, "रागावलेली छान दिसतेस." ते हसले. अतिप्रसंग करून निसटण्याची सोय नव्हती. प्रत्यक्ष यजमान अडवण्यास उभे. मी तणतण करीत रस्त्यावर पाहणाऱ्या खिडकीशीं जाऊन उभी राहिलें. कान, घोले काय म्हणतात इकडे होते. घड्याळ आणण्यांत आपली फसवणूक झाली का?— या विचारानं जीव खालीवर होत होता.

" ताई," घोल्यांनी घसा साफ करीत म्हटलं, " हें घड्याळ त्यांतल्या त्यांत बरं आहे. पण हें तुम्ही न घ्यावं हें बरं."

" घेतलं तर किती किंमतीपर्यंत घ्यावं? —" ताईंनी एकवार माझ्याकडे निसटत्या नजरेनं पाहत विचारिलं.

" हौसेला मोल नाही नी भोळ्या गिऱ्हाइकाला अक्कल नाही — असा प्रकार असला म्हणजे या घड्याळाची किंमत पाऊणशें शंभरापर्यंतसुद्धा सांगतां येईल. कारण, दिसण्यांत हें फाकडूं आहे. — पण मुळांत हें तीस पस्तीसच्या पुढं असूं नये."

" काय, काय म्हटलंत? —" मी वळून विचारलं, " तीस पस्तीस? कसं शक्य आहे? — शंभराचं घड्याळ आहे तें."

घोले किंचित् नवलानं माझ्याकडे पाहत म्हणाले, " असेल ना. असेल ना. पण आमच्या दुकानीं हा माल आहे. अन् गिऱ्हाईक तोडायचं नसलं तर व रोखींचं असलं तर आम्ही तें तिसापर्यंत देऊं."

मी काय बोलणार? एका दर्दी माणसाचा तो अभिप्राय होता. मी गोंधळलें व पुन्हा रस्त्यांत पाहूं लागलें.

ताई म्हणाल्या, " घोले, तुम्हांला थोडा त्रास झाला नाही का? — पण बरं झालं तुम्हांला विचारलं तें. हें घड्याळ एका आडलेल्या बाईचं आहे. साठापर्यंत देते म्हणाली. मी विचार केला — आमच्या नव्या वकीलसाहेबांना घ्यावं —"

" मग असलं लौकर खराब होणारं घेऊं नका —" घोले यंत्र खिशांत टाकीत बोलले. " मी यापेक्षा चांगलं व किंमतीला योग्य असं देईन. पैशाचाहि तगादा नाही." ते उठूं लागले.

" चहा घेऊन जा न —" ताईंनी हसत म्हटलं.

मी दाराकडे धावलें. " सोडा वाट. मला चहा करायला जायचंय् —" मी यांना म्हटलं. यांचा हात बाजूला सारून मी खालीं पळालें.

मागाहून जाऊबाई आल्या.

मी मनाशीं भारी खिन्न झालें. पण बाईंनी प्रेमळ शब्दांत म्हटलं, "उगीच कशाला वाईट वाटून घेतेस. तुझ्या जागीं मी असतें तर अशीच वागलें असतें. हौस करण्याच्या अनेक गोष्टी मनांत येतात. घाईत आपण कांहीतरी करून बसतों. फसतों. जग उचल्यांचा बाजार आहे. आपण आपली पिशवी सांभाळली पाहिजे. — आणि हें व्हायला घरांत एखादी खाष्ट सासू किंवा खट्याळ वडील जाऊ असायला पाहिजे. काय समजलं?" त्यांनी हसत माझ्या पाठीवर थाप दिली.

रात्रीं यांनी घड्याळाची भानगड काय म्हणून प्रश्न केला. मी गंभीरपणें जाऊबाईंच्यावर सारं ढकललं.

फ्दरांत पडलेल्या घड्याळाची पुढं वाट काय? — मला थोडीशीं चिंता वाटली. पण ताईंनी तों प्रश्न माझ्यापर्यंत येऊं दिला नाही. त्या तशा जहांबाज व पट्टीच्या भांडणाऱ्या होत्या. दुसरे दिवशीं त्या मंडईत म्हणून गेल्या. तासाभरानं परत आल्या. नंतर त्यांनी मला "दहा रुपये परत आणले व घड्याळ परत केलं." एवढाच निरोप सांगितला. तो व्यवहार सुधेपणानं कसा तुटला? — याचं चर्वण मी केलं असतं तर कदाचित् त्यांनी घडलेला प्रकार मला सांगितला असता. पण ती चौकशी करण्याची मला इच्छाच झाली नाही. जग म्हणजे शुद्ध फसवणुकीचा बाजार आहे या विचारानं मी भारी व्यथित झालें होतें. मला तो अपमान वाटत होता.

घड्याळाचा प्रकार माझ्या मैत्रिणींच्या गोटांत कळायला दोन दिवस लागले. पण त्याचं सार वेगळं निघालं. कुमूदची जाऊ तिला कसलंहि स्वातंत्र्य देत नाही. आणि हा अन्याय कुमूद दुबळेपणानं सहन करते. नवऱ्याचंसुद्धा तिला साह्य नाही!

– ७ –

## माझे दोन मुखवटे

आपल्याला दुसऱ्याचं मन कळत नाही. पण स्वतःचं मन तरी स्वतःला कळतं का? — अमूक वेळीं आपण असं कां वागलों? असं कां बोललों? — असे प्रश्न स्वतःला केले, तर समर्पक उत्तर देतां येतं कां आपल्याला.

मला नवल वाटतं व हसूं येतं .तें याच गोष्टीचं . कुठंतरी मी एक चुटका वाचला होता.

> दुसऱ्याविषयी माणूस चटकन् गैरसमज कां करून घेतो? दुसऱ्याचे आचारविचार त्याला चमत्कारिक, नावडण्यासारखे व टाकाऊ कां वाटतात? — त्यानं स्वतःचं निरीक्षण नीट केलं नसतं म्हणून. ज्याला स्वतःच्या आचारविचारांचा नीट उलगडा होत नाही, त्यालाच दुसऱ्याच्या साध्या सुध्या आचाराविषयी शंका येते. विचार तुच्छ वाटतात! आरशासारखं आहे. जसं रूप तसं प्रतिबिंब!

टी. डी. कुमूद रायकर या धर्तीची एक सामान्य व्यक्ति सा. बाईनं कोणता मुखवटा घातला आहे हें ती पाहत होती. तिच्या जावेच्या तोंडावर असा एखादा मुखवटा असेल का? अशा शंकेनं ती गोंधळली होती. पण अशावेळीं आपणही असा एखादा मुखवटा चढवून वावरत

असूं, हें कांही तिच्या ध्यानीं येत नव्हतं.

मनुष्यस्वभावाची काय गंमत आहे?—"मीं हसतें लोकाला नी घाण माझ्या नाकाला!" किती बरोबर म्हण.

घड्याळाच्या कहाणींतून असं एक विचित्र तात्पर्य माझ्या मनांत निर्माण झालं : "ताईनी असं करायला नको होतं!"

मी त्यासंबंधांत चुकलें—फसलें होतें हें मान्य. पण जाऊबाईंनी जी उपाययोजना केली, छे: ! चुकलंच त्यांचं.

माझ्या भोवतालच्या जगांत खरं म्हणजे कांही उत्पात घडला नव्हता. पातेल्यांत खळबळलेलं पाणी! किती वेळ नाचलं असेल?—पण माझ्या मनांत?—ठस्‌दिशी डोक्याला कांही लागलं अन् तें बोथट असलं तर टेंगूळ येतं. दोन दिवस दिसतं, पुढं नाहीसं होतं. पण त्या जागीं हात लावला तर, झालेल्या दुःखाची जाणीव होण्यासारख्या वेदना होतात!—मनाची स्थिति याहीपेक्षां विचित्र आहे. तें आपला आपण धक्का लावून घेतं, विवळत बसतं! तशांत भोवतालीं उणं पाहणारीं माणसं असावीं. तीं फुंकर घालून गार वाटावं म्हणून प्रयत्न करतात, पण धूर्तपणानं अंगार फुलवतात!

माझ्या वाढत चाललेल्या प्रतिष्ठेचा जाऊबाईंना हेवा वाटतो, असं मीं गृहीत धरलं होतं. आणि माझ्या मैत्रिणींच्या घोळक्यांत बसून मी त्यांना तें सोदाहरण पटवून दिलं होतं!— त्यांनी कां नाकारावं तें! त्यांनी माझ्याशीं होणारा अन्याय उचलून धरला. त्याचा प्रतिकार झालाच पाहिजे असंहि प्रत्येकीचं मत पडलं. प्रत्येकीनं कमालीची सहानुभूति दाखविली व पोक्त सल्लाहि दिला!

पण याच वेळीं मीहि जाऊबाईंचा एका विशेष प्रकारानं हेवा करीत होतें. हें माझ्या लक्षांत आलं नाही. मला कोणी सांगितलंहि नाही.

आज मी प्रामाणिकपणानं त्या काळच्या कौटुंबिक जीवनाचं चित्र पारखूं शकतें. आमच्या संसाराचीं सारीं सूत्रं जाऊबाईंनी आपल्या हातांत ठेवलीं

होती यांत शंका नाही. शिस्तीला कडक, वर्तनांत सोज्वळ, सदैव उद्योगमग्न आणि अत्यंत स्वकर्तव्यनिष्ठ अशा त्या होत्या. पहिला कांही काळ त्यामुळं मी भारून गेलें! त्यासंबंधीं मी माझ्या माहेरीं स्तुतिस्तोत्रं गायलीं आणि मैत्रिणींतहि चित्रं रंगविलीं! — पण त्यावेळीं त्यांना तीं खरीं वाटलीं का? — नाही. बहुतेक सर्व जणी "छान! छान!" म्हणत हसल्या! — पण त्यांत केवढं छद्म होतं! — "पाहूं. — पाहूं —" असं म्हणत प्रत्येकीनं माझ्या पाठीवर थाप दिली होती! — आणि तोहि माझा एक मुखवटा होता. माझ्या मनाचा मला नीट उलगडा झाला नव्हता.

आमची सर्वांची मिळकत जाऊबाईंच्याकडे जमा होत होती. पण या खजिन्याला बंदोबस्त होता का कांही? — नाही. फक्त त्यांत एक व्यवस्था होती. सामानाच्या खोलींत एक बंदिस्त कपाट व त्यांत एक चांगल्यापैकी कॅश बॉक्स. किल्ली त्यालाच. अट एवढीच. पैसे काढायचे झाल्यास बाईंना आधी सांगायचं. मी उचललेल्या रकमेची चिठ्ठी त्यांत टाकून ठेवायची! — मुलांना ही सवलत नव्हती. अर्थात् बाईंच्या व्यतिरिक्त कॅश बॉक्सला हात लावायचा म्हणजे मी किंवा हे. पण यांची एकंदर वृत्ति भाऊभावजयीपुढं लहान मधु—माधवाप्रमाणं. व्यसन कसलंच नाही नी तारुण्यसुलभ अशा हौशी अगदी मर्यादित. फावल्यावेळीं टेबलावर तंगड्या टाकून वाचीत बसायचं किंवा अप्पाशीं गप्पा मारीत बसायचं. हें नच जमलं, मधूशीं विटीदांडू खेळायचा किंवा माधवीशीं सागरगोटे!

थोडं वेगळं लिहीत गेलें नाही का? — पण प्रसंग आला म्हणून पतिदेवांचं हें रेखाचित्र काढलं! — अन् खरं सांगायचं म्हणजे मला तें कधी Cartoon वाटलं नाही. — कारण, जीवनाविषयी माझ्या आशा आकांक्षा फारशा काव्यमय नव्हत्या. असो.

— आणि याचमुळं कीं काय कोण जाणे, जाऊबाईंचं व्यक्तिमत्व मला केव्हांच नाकारतां आलं नाही.

या सुगृहिणीनं मला सासरीं प्रवेश करितांच सांगितलं होतं: सगळ्यांत आरोग्य श्रेष्ठ म्हणून त्याला आधी जपायचं. मग मन! — आपण चांगलं असून भागत नाही. आपल्या चांगुलपणाला दृष्ट न लागेल याला जपलं पाहिजे. हीन मनाचीं माणसं केवळ धनवन्ताचा किंवा गुणी लोकांचा द्वेष करतात असं नाही. तर चांगलं मनहि त्यांना पाहवत नाही. त्यांच्या वाणीची व विचारांची माशी आसडी घालायला टपलेली असते. आपण सावध असलं पाहिजे. — आणि कुमूद तिसरी जपण्याची गोष्ट म्हणजे धन. — तूं मिळवती आहेस ही फार आनंदाची गोष्ट आहे. तुझ्या सवयी साध्या आहेत, हेंहि ठीक आहे. पण तूं सावध मात्र असलं पाहिजेस. गुळाचा डबा नेहमी स्वच्छ पुसलेला असावा! पैशाच्या पिशवीचं तोंड थोडं आवळच असावं. उधळेपणा फार वाईट हें उधळ्या माणसालासुद्धां पटतं. पण औदार्य नी काटकसर यांचीं वर्तुळं चष्म्याच्या भिंगाप्रमाणं सारखीं असावीं. काटकसरीला शहाणपणाचं नी औदार्याला विवेकाचं कुंपण असावं. — काय समजलं?

या शिकवणींत जाऊबाईंच्या वागण्याचं प्रतिबिंब होतं. आणि संसारांत त्यांचा वचक असण्याचं तेंच कारण होतं. त्यांना सावत्रभाव माहीत नव्हता तसा. जावेचा तोराहि माहीत नव्हता — आणि म्हणूनच त्या घरांत माझा तोरा मानण्यास तयार नव्हत्या! काय चुकलं यांत? — पण माझ्या दृष्टीनं पुढं पुढं यांतच चुकांचं पीक उगवलं.

घड्याळाच्या आख्यानाचा शेवट मला कडू जहर वाटूं लागला तो यामुळं. माझ्या भानगडींत त्यांनी पडायला नको होतं. शंभर रुपड्यांची बाब! अशी काय दौलत वाया जात होती. पण काय त्यांनी थैमान घातलं! घोल्याला काय बोलावलं? घड्याळाची किंमत काय ठरवली? — आणि शेवटीं घड्याळ परत काय केलं? — जणूं काय सारा शहाणपणा यांनाच दिलाय देवानं! — नाचरी बाहुली मेली! — अस्सा संताप होतो

जिवाचा!

मी इतकी उसळून बोलल्यावर साक्रीकरबाईंना माझ्याविषयी कळवळा कां न येईल? — त्यांनी शपथेवर सांगितलं "त्या घड्याळाची किंमत इतकी कमी खास नाही. घोले· तुमच्या जाऊबाईला मथलेला असला पाहिजे. अन् समजा, असलंच तें घड्याळ स्वस्तांत, तर माझ्या भावानं नसती का कांही तडजोड केली? — पांच पंचवीस कमी काय, नी जास्त काय? — त्याचं दुकान नको का चालायला!"

किती कळकळीनं बोलल्या त्या!

बरं, जाऊबाईंनी केला एक फाजीलपणा. आमच्या ह्यांनी नको होता का बायकोचा कैवार घ्यायला? — घड्याळासंबंधीं काय भानगड आहे? एवढं तरी विचारावं! — पण सारा बावळटपणा? — माझ्या सदिच्छेला त्यांनी अस्सं लाथाडलं! — पण मलाहि कांही अभिमान आहे म्हणावं! प्रसंग पडल्यावर असं झणझणीत उत्तर देईन! ज्याचं नांव तें!

माझा हा आवेश साक्रीकरबाईंना एकदम पटला. मोठ्या आपलेपणानं त्यांनी माझ्या पाठीवरून हात फिरविला नी म्हटलं, " तूं सालस म्हणून तूं हें सारं खपवून तरी घेतलंस. आपल्याला हें नसतं सहन झालं! छे, छे! अगदींच अन्याय. अन् नवल वाटतं राजाभाऊंच्या बावळटपणाचं. हः! — Simpleton! — वकील झालेल्या तरुणाला हें नाही शोभत!"

मला पटलं त्यांचं हें बोलणं! — हसण्यासारखीच गोष्ट आहे नाही का! याच बाईनं 'माझा क्लेम पहिला' म्हणून मला धमकी दिली होती! — तिचं माझं बिनसलंहि होतं! — मी तिला टाकाऊ — लावसट — समजत होतें. सवत होणार कीं काय म्हणून भीत होतें. आणि आज ती माझी मैत्रीण ठरली होती! मी तिच्याशीं हितगूज करीत होतें.

माणसाच्या मनाची काय रचना आहे!

हा फरक कसा घडून आला? — सांगायचं विसरलें. आमचं तें मॅट्रिक

विद्यार्थिनींकरितां लिहिलेलं पुस्तक! साक्रीकरबाईंची कल्पना वाईट नव्हती. मुलींना अभ्यासांत कोणत्या अडचणी भासतात व प्रत्येक विषयाच्या अभ्यासाची मोडणी कशी असते, इत्यादि गोष्टी लक्षांत घेऊन आम्ही दोघींनी शंभर सवाशें पृष्ठं भरेल असं एक पुस्तक तयार केलं होतं. पण पुढं नव्या लेखकाच्या वाट्याला येणारं अपयश आम्हांला मिळालं. त्या पुस्तकाला प्रकाशक कोणी आढळेना. स्वतः छापून काढावं म्हटलं तर तें आम्हांला झेपण्यासारखं वाटेना.

तें कांही असो. त्या पुस्तकाच्या निमित्तानं आम्ही दोघी जवळ जवळ आलों. वयाचं अंतर तुटलं. विरोध नाहीसा झाला. मैत्रिणी बनलों. हित-गूज करूं लागलों. असो.

माझ्या कौटुंबिक जीवनाविषयी आम्ही असा खल करीत आहों तों अरुणा भाटे प्राप्त झाली. मागाहून आली सिंधू पाटील आणि मग आल्या सरला व प्रमिला. नेहमीचा संच जमला. ताजं आख्यान घड्याळाचं. तेंच पुन्हा निघालं. सर्व मैत्रिणींना माझ्या हिताहिताची चिंता वाटूं लागली. हजर नसलेल्या जाऊबाई मंडळापुढं धरून आणल्या! त्यांच्या अंगावर कुचेष्टेचा शेणखळा किती उडवायचा याचा सुमार आम्ही ठेवला नाहीं. त्यांच्या हाताखालीं वागलेली मी. छळांत सांपडलेली मी! — मीच मुळीं त्यांच्या नांवाचा उच्चार अंबाबाई असा एकेरी शब्दांत करून पहिला गोळा फेकला! — पिशाच्या हातीं कोलीत गेलं!

"स्त्रियश्चरित्रं!" अरुणा उद्गारली!

"पुरुष उगाच मिंधा होत नाही," सरला डोळे मिचकावून म्हणाली. मी चपापलें! सगळ्यांच्याकडे पाहूं लागलें. साक्रीकरबाई खुबीनं हसल्या.— "काय अर्थ याचा?" मी रागानं विचारलं.

"अं:! तें नाही विचारांत घ्यायचं." प्रमिला म्हणाली "पुष्कळ कुटुं-बांत अशा गंमती असतात --"

" गंमत ! — कसली गंमत ? " मी वेड्यासारखा प्रश्न केला. त्यांच्या बोलण्यांतील गटारघाण न समजण्याइतकी मी भोळी नव्हतें. माझ्या मस्तकांतील शिरा तणतणूं लागल्या ! — यांत सिंधू कांही पुटपुटली ! दीर भावजयीचं प्रेम असे कांही शद्ब असावे.

साक्रीकरबाईंनी माझी मुद्रा पाहिली. त्यांनी ताडलं. त्या मध्येच म्हणाल्या, " ए पोरींनों, चला. त्या गप्पा राहूं देत. मी कॅरमबोर्ड काढतें. हं — कुमूद, ती पुस्तकं आवर पाहूं — "

मी संतापानं थरथर कांपूं लागलें. मी चेकाळून गरजलें, " जळो तो तुझा कॅरमबोर्ड ! — माझ्या यजमानाविषयी नी जावेविषयी वाटेल ती घाणेरडी शंका घ्यायला तुम्हाला शरम नाही वाटत ? — प्रत्येकीनं लांब जीभ काढून तोंड विटाळलंत ! — पुन्हा तोंडांतून ब्र काढा नी पाहा काय चमत्कार होतो ! — पायांतील चप्पल धड नाहीं ठेवणार ! — पाजी ! — मैत्रिणी म्हणवतां नी असली घाण ओकतां ! "

माझा हा अवतार अनपेक्षित होता. सर्वच घाबरल्या व दूर दूर सरल्या. साक्रीकरबाई दुरूनच " शांत हो कुमूद, यांचा म्हणण्याचा अर्थ तसा नाही — " असा युक्तिवाद करूं लागल्या.

" एक शब्द बोलूं नकोस — " मी त्यांना झाडीत म्हटलं, " तूं त्यांच्या या पापांत सामील आहेस. — " अति संतापानं मला हुंदका आला व डोळ्यांतून कढत अश्रू वाहूं लागले. मी ओठ आवळीत म्हटलं, " मी तुमच्या संगतींत आलें, ही माझी पहिली चूक. तुमच्यासारख्या हलकटांची सहानुभूति मिळविण्याचा प्रयत्न केला ही दुसरी चूक अन् माझी मला जीभ आवरतां आली नाही तिसरी चूक. — मरा अवदसांनो, यापुढं तुमचं तोंडहि पाहायला नको — " मी त्वरेनं उठले व धावतच घरीं आलें.

या वेळीं पांचाचा सुमार असावा. अंगणांत कांही धान्य वाळत घातलं होतं. जाऊबाई तें आवरीत होत्या. माझा चेहरा पाहतांच त्या चपापल्या.

एकदम उठून त्यांनी मला आडव येत प्रश्न केला, " का ग ? — काय झालं ? "

मी काय बोलणार ? नी काय सांगणार ? त्यांच्या तोंडाकडे पाहण्याची मला शरम वाटली. मी बेमुर्वतपणानं त्यांना डावलीत म्हटलं, " माझ्याशीं एक शब्द बोलूं नका. जगांत मला कुण्णा कुण्णांची गरज नाही. " मी घराकडे धावलें. बाईंचा शब्द ऐकला : " तथास्तु ! "

ठरावाप्रमाणं दिवस संपला, रात्र आली. कळसूत्री बाहुलीप्रमाणं मी वागत होतें. इतर मंडळी नित्याप्रमाणं हसत खेळत वावरत होती. मी स्वतःवरच चिडलें होतें. जीवनाचा मला उबग आला होता.

जेवतांना हे म्हणाले, " वहिनी, कांही म्हणा बुवा ! — तुमच्या हाताखालीं माझ्या बायकोचा छळ होत असला पाहिजे. "

बाईंनी हसत मान डोलावली. अप्पांनी म्हटलं, " राजा, तुला सदा हसायला पाहिजे. कुमूदला नसेल साधत तें. तूं मुकाट्यानं जेव पाहूं. मुलांच्या समोर भलता विनोद उपयोगाचा नाही. "

रात्रीं आमची भेट झाली. मी खिन्न स्वरांत यांना म्हटलं " हें पाहा, आज माझं मन अगदी स्वस्थ नाही. तुम्ही माझ्याशीं कांही हास्यविनोद करूं नका. मला स्वस्थ पडूं द्या — "

" अगदी कबूल — अगदी कबूल — " हे म्हणाले, " पण तुला त्रास कां होतो याचं कारण शोधलंयस् कां ? "

" मी वेडी आहें हे मला कळतं — "

" छॅट ! — टी. डी. झालेली बाई वेडी असणं शक्य नाही. " हे म्हणाले, " तें जाऊं दे. तुझं काय चुकतं तें सांगतों. — हं — हा असा मी शेषशायी भगवानाप्रमाणं निजतों. अन् तूं अशी लक्ष्मीप्रमाणं पाय चेपत बैस पाहूं. "

" मग गप्प बसाल ? " मी विरक्तीनं विचारलं.

"तें कसं जुळेल? —" यांनी गंभीरपणें म्हटलं, "विष्णु लक्ष्मी किंवा शिवपार्वती एकत्र असल्यावर गप्प का बसतात कुठं? जगाची उठाठेव करायची असते त्यांना —"

"मला त्याची जरूर नाही. जग अगदी दुष्ट आहे नी जीवन म्हणजे नुस्ता उकीरडा आहे —"

"असेल — असेल! — पण आपलं जग म्हणजे तुझं माझं जग त्या पलीकडे कुठं तरी आहे हें विसरूं नयेस."

– ८ –

## जीवनाचं हें स्वरूप खरं.

माझ्या जाऊबाई व पति या दोघांचाहि मला मधून मधून खूप राग येई. पण त्या दोघांच्या शीलाविषयी वा संबंधाविषयी मला चुकूनहि संशय आला नाही. त्या दोघांविषयी मला पूर्वीपासून व या क्षणापर्यंत प्रेमादर भाव आहे. ' झक् मारतं जग ! असं म्हणण्याइतपत मी बेफिकीर आहे. परंतु मैत्रिणींच्या मेळाव्यांत झालेला तो प्रकार, त्या बेअकली मुलींनी काढलेले ते हलकट प्रलाप — छीः ! मला भारी असह्य झाले ! — कां, कां अशा अधम शंका जगानं घ्याव्या ? — सामान्य, कुटाळखोर लोक परनिंदेवरच जगत असतात. त्यांनी वाटेल तें बोलावं. पण तोच आचरटपणा सिंधु-सरला-प्रमिला या सारख्या सुशिक्षित मुलींनी करावा ? — साक्रीकरबाईंनाहि त्यांत गंमत वाटावी ?

मला जगाची घृणा आली. जीवनहि नको वाटूं लागलं ! स्वतःशीं चिडलें. खूप त्रासलें.

अशा मनःस्थितींत जगाचं चित्र कसं दिसलं असेल ? — घरांत — जाऊबाई ? — कठोर dictator ! महा aristocrat ! यजमान ? — वकील झाले तरी childish ! — आणि बाहेरच्या जगांत — मैत्रिणी ? – filthy ! तोंडसुद्धा पाहूं नयेत त्यांचीं ! – नोकरी ? — नांवाला गुरुपद ! — खरं गुराखीपद ! — विसाव्याला जागा आहे का कुठं ?

बिचारी कुमूद ! मी स्वतःला कुरवाळलं ! शहाणं म्हणून घेतलं ! साल्स ठरवून टाकलं !

आता मनांत येतं ! त्या वेळीं मला एखाद्या बक्षिसाची लालूच दाखवून ‘ जग व जविन ’ यावर एखादा निबन्ध लिहिण्यास सांगितला असता तर? — निःसंशय मी लिहिलं असतं : जग सुंदर आहे. केवळ फुलबाग आहे. जविन कर्तव्य बजावण्याकरितां आहे. माणसानं त्याचं हसतमुखानं स्वागत केलं पाहिजे. परिस्थिति असेल ती खरी ! — आपण तसं adopt झालं पाहिजे.

बरोबर आहे. त्रयस्थ राहून उपदेश करायचा असतो. बिघडलं काय ?— उपदेशाची खैरात इतरांकरितां. नाही का ?

माझी विमनस्कता रात्र ओलांडल्यावरहि टिकली ! जाऊबाईशीं मी कांही बोललें नाहीं. यांच्याशीं ? — गंभीरपणानं कांही बोलण्याची सोय नव्हती.

मी ठरविलं : दोन दिवस रजा घ्यायची नी स्वस्थ पडून राहायचं ! — जळो तें जग नी जविन ! — श्यामाबरोबर मी किरकोळ रजेचा अर्ज पाठवून दिला.

कौटुंबिक जीवनांत मी एक दन्ताळी चक्र होतें आणि त्याचे दांते जाऊबाईंच्या चक्रास जोडले होते. यामुळं दिनक्रमांतील ठराविक वेढे त्यांना धरून घेणं भाग होतं. पण हें मी हसतमुखानं केलं पाहिजे, असा जाऊबाईंचा धाक. त्या तशा वागत. यामुळं माझी विमनस्कता त्यांच्या ध्यानीं येतांच त्या म्हणाल्या, “ तुम्ही तरुण मुली लागलचि कुढत कां बसतां कोण जाणे ! ”

“ जावे त्याच्या वंशा तेव्हां कळे — ” मी उद्गारलें. बाई काम करतां करतां थांबल्या. भिवया उंचावीत नाटकी स्वरांत त्या म्हणाल्या, “ अस्सं का ! – छान ! छान ! ! — ” त्या हसल्या.

काम होतांच मी माडीवर गेलें नी गादी पसरून पलंगावर पडले.

वरच्या पाटणीवर अनेक प्रश्नचिन्हं होतीं.

सुमारें पांच मिनिटं गेलीं. जिन्यावर पाऊलं वाजलीं. मी अदमास बांधला. जाऊबाई येत असाव्या. मला तें नको होतं. पण टाळायचं कसं? — मी अंग घुसळून पाठमोरी पडलें.

जाऊबाई पलंगाजवळ आल्या. माझ्या अंगावर ओणवल्या माझ्या अंगाला त्यांनीं हात लावून पाहिला. खाकरत त्या मला टेकून बसल्या.

"बाईसाहेबाचं आज कोणतं सूख दुखतंय्?"

"मला उपदेश ऐकण्याची इच्छा आता तरी नाही —" मी किंचित् गुरगुरत म्हटलं.

"आज कामावर कां गेली नाहींस? याचं उत्तर पाहिजे मला—" बाईंनी दटावणीच्या सुरांत विचारलं, "तूं रजा घेउन घरीं कां राहिलीस?"

मी चटकन् उठून बसलें. त्यांच्याकडे थोडं रागानं पाहत म्हटलं, "या बाबतींतसुद्धा तुमचा धाक. नवल आहे.—मी कांहीं सांगत नाहीं. मला घरीं राहावंसं वाटलं म्हणून राहिलें."

"उगीचच? —" बाईंनी विचारलं, "किती दिवस?"

"तें ठरवलं नाहीं अजून —"

"मग आताच बजावते — आज माफी. पण उद्या तुला घरीं राहतां येणार नाही. तुला कामावर गेलं पाहिजे."

"हा शुद्ध जुलूम आहे —" मी दुबळ्या स्वरांत म्हटलं. बाईंच्या नजरेला नजर देऊन तुटक बोलण्याची मला सवंय नव्हती. आणि बाईंना हें माझं व्यंग माहीत होतं.

मी गांगरून बोलतांच त्या म्हणाल्या, "जुलूम! — केव्हांहि Spare the rod, spoil the child —(त्या हसल्या. मलाहि

हसूं आलं.) -- "माझ्या कुटुंबांत, माझ्या हातीं सत्ता असेपर्यंत मी माझ्या मुलांना भलतं वागूं देणार नाहीं. समजलं?"

"आज तरी स्वस्थ पडूं देणार का?—" मी पुन्हा थोडं अवसान धरून विचारलं.

"कांही वेळ --" बाई सस्मित मुद्रेनं माझ्याकडे पाहत म्हणाल्या, "माझी आत्तां विश्रांतीची वेळ आहे. दोन वाजतां ती संपेल. मग मी हाक मारीन. तुला यावं लागेल. काल जोंधळ्यांना ऊन्ह दिलं आहे. आज ते पाखडून भरून ठेवायचे आहेत."

"समजा," मी म्हटलं, "मला आज कोणतंहि काम करण्याची इच्छा नसली तर?"

जाऊबाई क्षणभर थांबल्या. नंतर म्हणाल्या, "मग तूं खरंच आजारी आहेस असं समजेन. सगळीं कामं बंद ठेवीन नी तुझ्याजवळ येऊन बसेन, तुझं कपाळ चेपीन न् तुझ्या आजाराचं कौतुक करीन—काय समजलं?"

मी काय बोलणार? त्या आंतून बाहेरून खरंच सरळ होत्या. मी गप्प राहतांच त्या पुढं म्हणाल्या, "तुझं कांहीं तरी बिनसलं आहे हें मला कळतं. पण त्याचं कारण अगदी फुसकं असलं पाहिजे."

"खरं आहे. परदुःख आईस्क्रीम आहे हें खरं—"

"अगदीच खरं." बाई म्हणाल्या, "पण ती प्लेट माझ्या पुढं येऊं दे. हं, सांग काय तक्रार आहे तुझी?—बहात्तर रोगांपैकीं आठवेल तो रोग सांग. पण तुला उगीच असं फुगून बसतां येणार नाही." असं म्हणत बाईंनी तसा मुखाविर्भाव केला.

मला पुन्हा खुदकन् हसूं आलं. बाईंनी झुकून माझा हळूच गालगुच्चा घेतला नी म्हटलं, "अस्सं!—मोकळेपणानं हास अशी. -- फार सुंदर दिसतेस तूं— बरं असो. अन् हें बघ, हिताचं सांगतें. विनाकारण घरीं राहत जाऊं नको. ती म्हण—लक्षांत आहे ना, रिकाम मन—सैतानाचं

धन ! — अगदी ध्यानांत ठेवली पाहिजे आपण. — म्हणून थोरल्या जाऊबाईंच्या धाकट्या जावेला सक्त हुकूम आहे कीं, तिनं अकारण घरीं राहूं नये – "

किंचित् स्वतःशीं हसत त्या मान डोलावीत पुढं म्हणाल्या, "तुझ्या मनाला कांहीं त्रास झाला असेल, कोणी टाकून बोललं असेल किंवा कोणी कुरापत काढली असेल – पारिपत्य करण्यासारखा उपाय असला, अवश्य कर. तसं नसलं — सारं विसरून जा. अनुभवाचं सांगतें. आपुला आपण वैरी -- जाहला मानव या संसारी हें जास्त खरं आहे. आपण जन्माला आलों त्यावेळीं "सगळ्या गोष्टी तुझ्या मनासारख्या होतील – " असा पट्टा घेऊन आलों आहों का, मुळीच नाही. मग मनाला उगीच पिसाट कां बनवायचं ? – देव मोठा लबाड आहे, बरं का. स्वतःच्या भक्तालासुद्धा तो दाद देत नाही. प्रसन्न झाला तर वर देईल. पण भलती सवलत देणार नाही. — म्हणून माणसानं शहाणं झालं पाहिजे. -- ऊठ बसल्या जगावर रुसण्यांत अर्थ काय ? परवा कुठं बरं वाचलं – "

त्या आठवूं लागल्या. कांहीं वेळानं म्हणाल्या, " असेल कुठं तरी – मुद्याची गोष्ट सांगतें. जीवन म्हणजे गर्दीतून जाण्याची वाट. आपली कोपरखळी दुसऱ्याला लागायची. दुसऱ्याची आपल्या वाट्याला यायची. याला जपतां येत – रुसतां येत नाही. घाई सर्वांना आहे. क्यूमधे उभं राहून तिष्ठण्याचा कंटाळा सर्वांना आहे. यांतून सरळपणें व फारशा ठेंचा न खात। जायचं असेल तर ? – आपली कोपरखळी दुसऱ्याला न लागेल अशी दक्षता घेतली पाहिजे. चुकून लागली, क्षमा मागितली पाहिजे — "

" अन् दुसऱ्याची लागली तर ? — मुकाट्यानं सहन केली पाहिजे –" मी म्हटलं. "अहिंसा शास्त्रांतलि हें महान् तत्त्व आहे म्हणून विचारतें — "

"त्या सहनशीलतेला कांही मर्यादा आहे — " बाई म्हणाल्या,

"पण शासन करण्याचं सामर्थ्य पाहिजे.--पण खरं सांगायचं म्हणजे शांतपणानं नी समजुतीनं घेण्यांत गंमत आहे. जीवन हें तितकं अंदाधुंदीचं वा अन्यायाचं नाही --"

त्या एकदम थांबल्या. चपापल्याप्रमाणं करून म्हणाल्या, "कुमूद—मला वाटतं मी म्हातारी होत् चाललें! तुला काय वाटतं?"

बोलतां बोलतां त्यांनी किती वेगळा व विचित्र प्रश्न केला होता. मी खरोखरच नवलांत पडलें. मी म्हटलं, "मधेच हा काय प्रश्न काढलांत —"

"हेंच पाहाना --" त्या नवल दाखवीत म्हणाल्या, "मी इथं पाऊल टाकतांच तूं मला तराटणी दिलीस, उपदेश ऐकण्याची इच्छा नाही म्हणून. अन् मी तर व्याख्यान झोडलं तुझ्यापुढं. यावरून कसं विस्मरण पडलं, पाहिलंस. तेव्हां सांगतें, व्याख्यान टोचलं खुपलं या कानानं ऐकलेलं त्या कानानं सोडून द्यायचं. काय समजलं —" पुन्हा एकदा त्या हसल्या. मीहि हसलें.

माझ्या मनांतलि जळमटं झडून जाण्यास त्यांच्या या बोलण्याचा फार उपयोग झाला. त्या पुढं म्हणाल्या, "आता एक गोड गोष्ट सांगून उठतें. ताई आज आपल्या साऱ्या पिलांकरितां सुंदर सांजा करणाराय् घरच्या तूप रव्याचा! साखर इल्ला!—गुळाचा करायचा.—माधवीला हं गुपित शाळेला जातांना सांगून ठेवलंय्.—एवढं तेवढं गोड खायला मिळणं हा आज भाग्याचा दिवस होऊन बसलाय्! नाही का;—असो, आहे त्यांत आनंद मानला पाहिजे —" त्या उठल्या. जाऊं लागल्या. थांबल्या.

"विश्रान्ती घ्यायची नसली तर —" मी उठत व पलंगाखालीं उतरत म्हटलं, "मी आत्तासुद्धा खालीं येतें पाहिजे तर."

"अं—हं. त्याकरितां नाही थांबलें." जाऊबाई म्हणाल्या, "आणखी एक गुपीत सांगायचं राहिलं. उन्हाळ्याची सुट्टी लागली कीं,

आमची स्वारी तुम्हांला स्वराज्य देऊन माहेरीं जाणाराय् चार दिवस. — गांगरूं नका. — मला माहीत आहे. तुमचं दाम्पत्य जिवाची मुंबई करायला — ममईला जाणाराय्. तो बेत कळलाय् मला. त्या आड येत नाहीं मी. — आठ दिवसांत परत येणाराय् मी. फक्त श्यामा राहील तुझ्या-जवळ. तैमुरलंगहि (अप्पांचं नांव) राहतील. मी येईपर्यंत संसार कसा सांभाळतेस, पाहतें, अच्छा मास्तरीणबाई, नमस्ते — ”

मी किंचित् नवलानं पाहत राहिलें. बाई दारापर्यंत गेल्या व थांबल्या. चौकटीच्या एका अंगाला टेकत व हात लांबवून समोरच्या भागावर हात ठेवीत त्या म्हणाल्या, “मी गेल्यावर तुला एकटं एकटं वाटण्याचा संभव आहे. याकरितां मला वाटतं, तूं आपल्या आईला व एक दोन लहानग्या भावंडांना बोलावून घेईनास. तुझा संसार पाहूं दे ना त्यांना. — मात्र मी येईपर्यंत त्यांना ठेवून घ्यायचं अं. मी आठ दिवसांत नक्की परत येईन — ”

त्या जाणार; पण पुन्हा त्यांना कांहीं स्मरण झालं. त्या हसत म्हणाल्या, “मघाशीं थोरल्या जावेनं धाकट्या जावेला खालीं येण्याविषयी हुकूम सोडला आहे. तो मागं घेण्याची इच्छा नाही. पण सवलत मिळेल. स्वस्थ पडून राहाणं आवश्यकच वाटत असेल, पडून राहा. मात्र कुढत पडायचं नाही. वर पाटणीला असलेलीं जाळीं जळमटं पाहा आणि कोळ्याच्या उद्योगप्रियतेच व चिकाटीचं कौतुक कर. — शाळेंतील मुलांच्याकरितां एखादा पाठ तयार कर. उगीच स्वतःशीं चिरचिरत बसण्यापेक्षा उद्योग करीत मरण बरं.” नंतर त्या स्वतःला उद्देशून म्हणाल्या, “हं चला जाऊबाई, शहाणपणाचा सारा मक्ता स्वतःकडे घेऊन कुमूद रायकर टी. डी. यांना छळूं नका. — ” नंतर त्या पुन्हा मला म्हणाल्या, “अच्छा, मास्तरणिबाई, नमस्ते.” त्या निघून गेल्या.

मी नवलानं पाहत राहिलें.

बोला — माझ्या जाउबाईंना काय म्हणाल तुम्ही? — आपल्या भोवताली विषादाचं — त्रासाचं — धुकं पसरूं नये असाच त्यांचा प्रयत्न होता, नाही का? — मी पलंगावर जाऊन टेकलें. कांही क्षण तरी मोहित होऊन कुठं तरी पाहत राहिलें.

जाऊबाईंना जग ताई म्हणत होतं. घरांतहि आम्ही सारीं माणसं त्यांना त्याच नांवानं संबोधीत असूं. कौटुंबिक जीवनांत सहज शोभणारं तें नांव त्यांना किती शोभत होतं! — आमच्या कुटुंबांतील शांती-समाधानाचं मळसूत्र म्हणजे ताई!

सुगृहिणीचें एक सुंदर चित्र माझ्या डोळ्यासमोर उभं राहिलं. संसारांत रमलेली, कर्तव्य जाणणारी व समभावानं वागणारी ती मूर्ति स्वतःचा शह ठेवून वागत होती, यांत काय चुकत होतं तिचं? — हा धर्म आचरतांना ती कांही कठोर बोलली चालली; बिघडलं कुठं? — तिनं मानाची — आज्ञा पालनाची इच्छा धरली; बिघडलं कुठं?

ताई आपलं जिवन जगताहेत. पण हें करतांना त्या दुसऱ्याच्या आड येताहेत का? — नाही. Live & let Live याचं रहस्य त्या जाणतात. मग त्यांच्या निकट आलेल्या माणसांनी त्यांच्याशीं विसंवादी वागण्यांत अर्थ काय?

— १ —

## शेवटीं शहाणपण उतूं गेलें !

सांसारिक कामं उरकल्यानंतर जाऊबाईंना फावला वेळ किती व केव्हा मिळत असे, याची मला नीट कल्पना नाही. पण त्या वेळचा त्यांचा छंद होता. चांगलीं पुस्तकं वाचल्यानंतर किंवा व्याख्यान ऐकल्यानंतर त्यांतील मनाला आवडलेला भाग लिहून ठेवणं. या छंदाप्रमाणं त्यांच्याजवळ अनेक वह्या तयार झाल्या होत्या. या ज्ञानसंग्रहासंबंधीं त्यांची कांही गुप्तताहि नव्हती. असल्या वह्या मधून मधून चाळण्यांत गंमत असते, असं त्यांचं मत होतं. एका छोटया आजारीपणांत मी त्यांपैकीं एक दोन वह्या चाळून पाहिल्या होत्या. मला तो संग्रह मोठा आकर्षक वाटला असं नाही. पण बाईंच्या परिश्रमाचं कौतुक वाटलं.

आता हें प्रकरण लिहितांना मला वरील बाडांत वाचलेली एक गोष्ट आठवते. ती मी जशीच्या तशी खालीं देत आहे. प्रस्तुत प्रकरणाशीं या गोष्टीचा संबंध कितपत जुळेल, मला नीट सांगतां येत नाही. कदाचित् ती अनाठायीं होईल किंवा अप्रस्तुतहि वाटेल. गोष्ट आठवते ती अशी :

*　　　*　　　*

एक होता एवढासा जुगनू व एक होता बडा कवि. एका अंधाऱ्या रात्रीं त्या दोघांची अवचित गांठ पडली.

जुगनू आपलं भक्ष्य शोधण्यास बाहेर पडला होता. कवि एखादी असामान्य कल्पना जगाला बहाल करावी या महत्त्वाकांक्षेनं भटकत होता. दोघांचा अंधारांत सामना झाला. जुगनू कवीच्या बाहीवर अडकून बसला. कवीनं हात झाडून त्या चकचकत्या कीटकाला उडवण्याचा प्रयत्न केला. पण जुगनू भयानं आणखी चिकटून बसला.

कवीच्या सृष्टींत सगळ्याच गोष्टी अद्‌भुत प्रकारें घडत असतात. जुगनूच्या मुद्रेवर हास्य उमटलं असून तें उपहासात्मक आहे असं कवीनं पाहिलं. त्यानं तुच्छतेनं जुगनूकडे पाहत म्हटलं, "खद्योता, तूं कां हसतोस हें मी जाणलं. पण हें हसणं तुला योग्य नाही व शोभतहि नाही. तुझ्या मागच्या टोकाशीं असलेला प्रकाशकण अगदीच तुच्छ आहे बरं का. ताठ्यानं फुगून जाऊं नकोस. तूं सूर्याची बरोबरी करूं शकणार नाहीस, हें निश्चित समज."

जुगनू नम्रतेनं म्हणाला, "कविराय, आपल्या बोलण्याचा अर्थ माझ्या ध्यानीं आला नाही. माझ्या प्रकाशकणाविषयी मला घमेंड आहे, हें कोणी सांगितलं आपल्याला? — सूर्याशीं मी बरोबरी करतो असं म्हणतां. पण हा सूर्य कोण, मला माहीतसुद्धा नाही. तेव्हा जी गोष्ट मला कळतच नाही, तिच्याविषयी मी गर्व बाळगून आहें असं कसं म्हणतां?"

कविरायाची मान ताठ झाली. ते म्हणाले, "तुला कांही कळत नाही. म्हणजे तूं अज्ञानी आहेस हें सिद्ध झालं. अज्ञान हें अहंकार निर्माण होण्याचं फार मोठं कारण असतं. तूं गर्विष्ठ आहेस यांत शंका नाही. तूं सूर्याशीं स्पर्धा करण्याच्या निमित्तानं असा स्वच्छंद उडतोस व बागडतोस. पण काजवा तो काजवा नी सूर्य तो सूर्य! हें तारतम्य कवि ओळखून आहे. तो तुझी ही घमेंड चालूं देणार नाही. तो जगाला ओरडून सांगणार: कीं, काजवा सूर्याची बरोबरी करूं शकत नाही."

काजवा पुन्हा नम्रतेनं म्हणाला, "पण कविराय, जो विचार माझ्या डोक्यांतच कधी येत नाही —"

"पण माझ्या येतोना." कविराय ओरडून म्हणाला, "बाबा खद्योता, जें न देखे रवि तें देखे कवी. माझ्या योग्यतेबद्दल मी एक शब्दहि सांगूं इच्छित नाहीं. पण ध्यानांत ठेव. माझ्या प्रतिभाबलानं मी दिगन्ताचा ठाव घेऊं शकतों. आकाशांत भव्य उड्डाण करून कुठंहि गवसणी घालूं शकतों किंवा जगताचं जें आदितत्त्व त्याच्या बुडाशीं जाऊन तेथील सूत्रं कशीं हालतात हें जाणूं शकतों. — तुझ्या एवढ्याशा डोक्यांतील विचार मी ओळखीत नाहीं, असं कसं होईल? — तुला आपल्याजवळ असलेल्या प्रकाशकणाचा मोठा गर्व आहे, ही गोष्ट सूर्य प्रकाशाइतकी स्वच्छ आहे. म्हणून मी जगताला ओरडून सांगणार कीं, तुझ्यासारखा क्षुद्र जीव सूर्याची बरोबरी करूं शकत नाही. — सावध असा. काय समजलं? — "

जुगनू गोंधळला. तो अडखळत म्हणाला, "मी पामर जीव. तुमच्या बोलण्याचा मला कांही उलगडा पडला नाही."

"नाही पडायचा." कविराय म्हणाला, "म्हणून ध्यानांत ठेव. जग फार विशाल आहे. त्यांत तुझ्यासारख्या खद्योताची मातबरी नाही. — आत्तां या वेळीं माझ्या खोलींत चल. तिथं एक विद्युद्दीप आहे. तुझ्यासारखे कोटी काजवे एकत्र केले तरी त्या दिव्याची बरोबरी होणार नाही. आणि गंमत ही आहे कीं, त्या दिव्यापेक्षा भारी प्रकाशाचे दिवे आहेत. आणि त्या दिव्यांना फिक्के पाडणारा सूर्य आहे आणि त्या सूर्याला तुच्छ करणारे मोठे तारे आकाशांत आहेत."

"अबब! — " जुगनू नवलानं म्हणाला, "सूर्याला दिपवणारे तारे आहेत म्हणतां! — मग सूर्य उगवल्यावर तारे कुठं जातात कविराज? — "

एवढ्याशा कीटकाचा तो सरळ प्रश्न ऐकतांच कविराज गोंधळले. ते स्वगत म्हणाले, "खरंच! सूर्यापेक्षा प्रचंड तेजस्वी तारे आकाशांत असतील

पण त्यांचा प्रत्यक्ष उपयोग ?"

जुगनू पुढं म्हणाला, "कविराय, मी पामर. सहज विचारतो. सूर्याचा दिमाख मोठा असेल. पण अंधार पडल्यावर सूर्य कुठं जातो? — अन् अंधार पडल्यावर सूर्य नाहीसा होत असेल तर त्याच्या प्रकाशाचा काय उपयोग? —"

कविराय आणखी गांगरला. जुगनू किंचित हसत म्हणाला, "तुमचा तो झगझगीत दिवा. माझ्यासारख्यांना जवळ येऊं देणार नाही. मलाहि त्याच्याजवळ जाववणार नाही. मग मला पामराला त्याचा उपयोग? काळ्याकभिन्न अंधेरांत मी चमकूं नको तर काय करूं? — देवानं तेवढंच साधन मला दिलं आहे —"

जुगनू कवीच्या बाहीवरून चटकन् उडून गेला. कवीला विचार पडला, "काजवा सूर्याशीं स्पर्धा करीत असला पाहिजे, हें जें आपण जाणलं तें खोटं असेल का, — मग आपल्याला एक विलक्षण विचार सुचला, असं जें आपण गृहीत धरलं; त्याचा उलगडा काय?"

कवीला अंधेरांत ठेंच लागली. तो कोलमडून पडला!

* * *

* * *

वरील गोष्टीचं तात्पर्य काढण्याच्या भानगडींत कोणी पडूं नये. मलाहि तें सांगतां येणार नाही. — माझी स्वतःची हकीगत पुढं सांगतें.

मानवी वर्तनाच्या ज्या अनेक गंमती आहेत, त्यांत त्याच त्याच चुका पुनरावृत्तीनं करणं, ही एक गंमत मोठी विचित्र आहे. दुधानं तोंड पोळलं कीं, माणूस ताकहि फुंकून प्यायला लागतो; असं म्हणतात. पण सर्वांचा अनुभव तो आहे का? — मुळीच नाही. दुधानं तोंड पोळल्याची गोष्ट माणूस पुढच्या क्षणाला विसरतो म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति नाही. चूक झाली कीं, तेवढ्यापुरती दक्षता. तेवढ्यापुरता निश्चय. तेवढ्यापुरते

नियम. — तो भर ओसरला कीं संपलं! — जुनीच चूक नव्या पद्धतीनं करायची. मागचं सारं विसरायचं नी पुन्हा बेगुमानपणानं चालूं लागायचं.

मी या नियमाला अपवाद ठरलें नाहीं. जाऊबाईंच्या सांगण्याप्रमाण मी दुसरेच दिवशीं पुन्हां शाळेंत जाऊं लागलें. संध्याकाळपर्यंत साक्रीकर-बाईशीं माझं सख्य जमलं. पुढच्या चोवीस तासांत ढालगज मैत्रिणींच्या मेळाव्यांत सांपडलें ! मी त्यांचं वर्तन विसरलें. त्याहि सारं विसरल्या. किंवा त्यांनी तसं सोंग केलं.

पुढं दोन दिवसांत आमचं हितगूज होऊं लागलं. जगाच्या उठाठेवी आम्ही करूं लागलों. आपआपल्या घरच्या भानगडी बोलूं चालूं लागलों. प्रत्येक मैत्रिणीची आपआपल्या गृहस्थितीबद्दल — कुटुंबांतील कांही व्यक्तीबद्दल — कांहीना कांही कुरबूर होती. प्रत्येकीला आपले हक्क कळत होते. कर्तव्याचा उमज मात्र पडत नव्हता. आपल्याशीं कांहीतरी अन्याय होतो, या विषयी प्रत्येकीला खात्री होती. अर्थात् या वाटाघाटींत मी पुन्हा रंगूं लागलें. घरच्या गोष्टी सजवून सांगूं लागलें.

पानी तेरा रंग कैसा ? — जिसमें मिलावें वैसा !

माझ्या मैत्रिणींना हेंच हवं होतं.

माझ्या जाऊबाई चांगल्या असल्या तरी अेरेराव आहेत — प्रति हिटलर आहेत — हें पुन्हा प्रस्थापित झालं. या मंथनांतून आपल्या पायाखालची वाळू किती सरकत चालली आहे याचं भान मला राहिलं नाही. अन्याय सहन केला कीं, अन्यायाचं प्रमाण वाढतं ; हें महान् तत्त्व माझ्या डोक्यांत ठसलं. मी अस्वस्थ झालें. आपल्या हक्कांला आपण जागलों नाही, तर आपली रया राहणार नाही, याची जाणीव मी बोलून दाखविली ! — मग या निखाऱ्यांना आणखी फुलवण्याचं काम साक्रीकरबाईसुद्धा सर्व मैत्रिणींनी कां करूं नये ?

माझा विचारांचा तोल केव्हाच सुटला. विकार खळबळले. त्यांतून हलाहल निघालं: मी व माझे यजमान प्रामुख्यानं मिळवते असतां, त्यांना घरांत कसलेच अधिकार नाहीत. दोघा पतिपत्नींत infieriority complex निर्माण झाला असल्यामुळं जाऊबाईचं प्रस्थ वाढलं आहे! — आम्हा दोघां पतिपत्नींना महत्त्व शून्य!

ही गोष्ट मला कबूल करवेना. स्वतःच्या मनाला खोटी वाटेना. अशांत सिंधु साळसूदपणानं म्हणाली, "हें पाहा कुमूद. हातच्या कांकणाला आरसा नको. — आम्ही चार पांच जणीं तुझ्या घरीं सहज बसायला म्हणून येतों. मग तूं शिष्टाचाराप्रमाणं आम्हांला कप कप चहा देण्याचं ठरीव नी स्वतंत्रपणानं कांही करूं लाग. अन् यावर तुझ्या जाऊबाई कशा वागतात नी काय काय करतात, नमुना पाहा — "

हें बोलणं अशा थाटाचं होतं कीं, जणूं काय त्या भवान्या आमच्याकडे कधी खाऊन पिऊन गेल्याच नाहीत. परंतु या वेळचा प्रसंगच असा होता कीं, माझा अहंगण्ड तरारून उठावा.

मी कांही बोलणार तोंच दुसरी मैत्रीण प्रमिला म्हणाली, "हें बघ कुमूद, सिंधू म्हणते त्याप्रमाणं डाव टाकून बघच. तुझ्या जाऊबाई आहेत मिठास. त्या तुझ्या बेताला एकदम नकार देणार नाहीत. पण साखरेची दुर्मिळता व दुधाची टंचाई पुढं आणतील व चहा देण्याघेण्याचा शिष्टाचार आतां बंद केला पाहिजे, असं आग्रहानं सांगतील — "

"त्या पुष्कळ सांगतील — " मी आढ्यतेनं म्हटलं, "पण मी ऐकलं पाहिजेना. मी मनांत आणलं तर मी आमच्या घरीं श्रीखंडपुरीचा बेत करून तुम्हा मैत्रिणींना बोलावूं शकेन. जाऊबाई कशा आड येतात पाहूं!"

सरला म्हणाली, "आंधळा मागतो एक डोळा. देवानं दिले दोन.

तसं होतंय् हें. आम्हीं मागतों आहों चहा. तूं म्हणणार मी श्रीखंडपुरीचा बेत करतें. आमचं काय बिघडलं ग — ”

प्रमिला म्हणाली, “ हा हव्यास आपल्याला नाही मंजूर. चहा मिळाला व तो गुळाचा मिळाला तरी पुष्कळ झालं — पण मी सांगतें. कांहीच होणार नाही आहे ” —

अरुणा म्हणाली, “ मला तसं वाटत नाही. चहा मिळूं शकेल किंवा श्रीखंडपुरीहि मिळूं शकेल. फक्त कुमूदला आपला अधिकार गाजवण्याइतकं धैर्य आहे का ? ”

तात्पर्य, सर्वजणींनी मला एकदा घोड्यावर चढवलं व पुन्हा खालीं उतरवलं ! मला चिडवून तयार करणं हा त्यांचा मुख्य उद्देश. तो सिद्धीस जाण्याइतपत मीहि उल्लू बनलें. मी प्रथम त्यांची निर्भत्सना करीत म्हटलं, “ तुम्ही अगदी दरिद्री स्वभावाच्या मुली आहां ! मिजास राजाची नी नांदणूक कैकाड्याची. मिळाली तर तुम्हांला फुकटांत श्रीखंडपुरी पाहिजे. तें नाही साधलं तर तुम्ही चहाच्या पाण्यावरहि राजी आहां, नाही का ? — मग साफ सांगतें, तुम्हांला कांहीच नाही मिळायचं. तुम्हांला बोलावण्यावाचून माझं कांही आडलेलं नाही — ”

“ आम्ही काय म्हणतों — ” सिन्धु तुच्छतेनं म्हणाली, “ तेंच. — आम्हांला घरीं बोलावण्याची तुला छातीच नाही. ती तुझी खवीस जाऊं हूं कीं चूं नाही करूं देणार तुला ! — तूं आमच्याजवळ मार बढाया वाटेल तेवढ्या — ”

साक्रीकरबाई आतापर्यंत गप्प होत्या. त्यांनी माझा कैवार घेतला. त्या म्हणाल्या, “ ए पोरींनो, उगीच वादंग वाढवूं नका ग. चहा काय नी श्रीखंडपुरी काय, कुमूद तुम्हांला वाटेल तें खाऊं घालील. पण सध्याचे हे दिवस असे. साखरेचं बोलून चालून रेशन. तिला कां छळतां उगचि. —

चला, साखर आणून द्या, तिच्याकरितां मी देतें तुम्हाला श्रीखंडपुरीची मेजवानी -- ”

“ तिच्या घरीं ! ” सरलेनं खवचटपणें विचारलं. ती हसली. इतरहि हसल्या. — “ शक्य नाहीं — ”

मी एकदम म्हटलं, “ शक्य आहे — चला पैज. माझ्या घरांत माझा काय अधिकार आहे, दाखवतेंच तुम्हांला. मात्र बजावतें. तुम्ही हरलात तर काय देणार बोला — ”

“ पंधरा रुपयाची पैज — आमची तयारी आहे. ” प्रमिला म्हणाली, “ तूं करतेस त्या देखाव्याप्रमाणं तुझा बोज तुझ्या घरांत आहे, हें सिद्ध झालं — आम्ही हरलों असं सिद्ध झालं — पंधरा रुपये आम्ही देऊं — ( सर्वांची अनुमति मिळवीत ) होय की नाहीं ? ”

“ कबूल — कबूल — ”

“ पण कुमूदबाई, जर कां तुमचा फज्जा झाला — तर, ” प्रमिला — सरला जोडीनं म्हणाल्या, “ पंधरा रुपये तुला मोजावे लागतील. आहे कबूल ? — मग मात्र तोंड वेंगाडूं देणार नाहीं — ”

“ कबूल — साखरेचं काय करणार बोला ” — साक्रीकरबाईंनी मध्यस्थी केली.

“ तें आम्ही पाहतों — ” सिंधु म्हणाली, “ दर मात्र काळ्या-बाजाराचा पडेल. पोतंभर साखर आणून देतें — ”

माझ्याकरितां साक्रीकरबाईंनी दहा रुपये त्यांच्यापुढं फेकले. मेजवानीचा बेत एका आडवारी कायम करण्यांत आला.

बैठकींत हें कूट ठीक जमलं. पण घरीं येत असतां माझ्या मनाची अस्वस्थता वाढली ! — जाऊबाईची परवानगी मिळवून मेजवानीचा बेत करायचा कसा ! — आणि पैज जिंकायची कशी ! — अहंकारानं पेट

घेतला. माघार घेण्यांत अप्रतिष्ठा वाटूं लागली. मनाशीं ठरवलं. मेजवानीचा बेत करायचाच. माझी मी मालकिण नाहीं कीं काय ? जाऊबाई वळल्या, ठीकच झालं. मैत्रिणींचीं तोंडं आपोआपच फुटतील ! समजा, त्यांनी खुसपट काढलं — अडायचं नाही. त्यांना बाजूला सारायचं नी त्यांच्या नाकावर टिच्चून बेत करायचा. पैज जिंकायची ! — हार खायची नाही !

मी ऐटींत घरीं आलें. संधि साधली. जाऊबाईशीं बोलूं लागलें. मैत्रिणींत तयार झालेलं कूट आडमुठेपणाचं. पैज खुळचट. माझा ताठा पोचट नी माझी प्रतिज्ञाहि अचरट ! यामुळं मला मेजवानीचा बेत का करायचा ? हें सरळ समजावून देणें काठीण होतं. तसा मी खुलासा अगदी मनमोकळेपणानं ताईंच्याजवळ केला असता तर — पैजें जिंकण्याइतकं सहकार्य त्यांनीं निःसंशय केलं असतं — अर्थात् —

हें शहाणपण मला आतां सुचतं आहे !

जाऊबाई माझं आडवळणाचं बोलणं ऐकून थोड्याशा चकितच झाल्या. पण त्या वस्ताद होत्या. त्यांनीं उलट सुलट प्रश्न विचारतांच मी चिडलें नी अगदी तुटक भाषेंत म्हटलं, “ हें पाहा ताई, तुम्ही उगीच आढेवेढे घ्याल नी मेजवानीचा बेत हाणून पाडाल तर मी तुमचं मुळीच ऐकणार नाहीं. माझी मी स्वतंत्र आहें. मिळवती आहें. या घरांत माझाहि बरोबरीचा हक्क आहे. माझ्या मनाला येईल तें मी करणार. तुम्हांला आवडो न आवडो. तुमच्या रागालोभाची मला बिलकूल पर्वा नाही. ”

हें दुरुत्तर ऐकतांच बाई विलक्षण चपापल्या. संतापल्याहि. त्या दरडावून म्हणाल्या, “ कुमूद, तूं शुद्धीवर आहेस ? कुणापुढं तोंड करून बोलतेस —”

आणि माझ्या मुद्रेवर त्यांना कोणता भाव दिसला हरी जाणे ! त्या एकदम — एकदम — नरमल्या ! त्या माझ्यापुढून जात म्हणाल्या, “ कुमूदताई, तुझा बरोबरीचा हक्क मी मान्य करतें बरं. — मी तुझ्या आड

बिलकूल येत नाहीं."

मला आपटी मिळाल्याप्रमाणं झालं! — मी तात्काळ जाणलं: बाई आड येणार नाहीत. पण त्यांचं सहकार्यहि मिळणार नाही. अन् तें न मिळालं तर? — पैज जिंकण्याइतपत मी यशस्वी होणं कठीण होतं!

आतां पाल्हाळ लावीत नाहीं. वर्तमानपत्रांत येणाऱ्या रेखा चित्रपटाचं अनुकरण करतें.

**अंक पहिला—**

१ - जाऊबाईंचीं उदासीनता व राग. कुमूदचा तोरा व तयारी. २ - मैत्रिणींच्या साह्यानं मेजवानीसंबंधीं जुळणी. पैशाच्या पाकिटाला भोक. ३ - मेजवानीच्या दिवशीं जाऊबाई (शांतपणें) म्हणतात "घरांतील व्यवस्था मोडूं नये म्हणून मी कांही ठिकाणीं कुलपं लावणार आहें. — पण तुझा बरोबरीचा हक्क नाकारतां येणार नाहीं म्हणून किल्ल्या तुझ्याच स्वाधीन करणार आहें." ४ - मेजवानीची तयारी. स्वत:ला गुंतायला नको म्हणून प्रमिलेच्या ओळखीतील एक सुगरण चिंगू मावशी बोलावण्यांत येते. तिच्याबरोबर तिची दोन पोरटीं असतात. सोन्या वय वर्षें पांच. बाळ्या — आठ ५ - सात्रीकरबाई कॅरमबोर्ड आणतात!

**अंक दुसरा—**

१ — कां कोण जाणे — सकाळींच अप्पा, मन्नू व माधवी टांग्यांतून कुठं तरी आपल्या नात्याच्या घरीं निघून जातात. माधव कुठंतरी वन-भोजनाला म्हणून दशमी घेऊन निघून जातो. श्यामा फक्त चुलतीच्या हाताखालीं. २ कुमूदला ही इष्टापत्ति वाटते. तिची यजमानांना घराबाहेर ळपण्याची विनंति. घरांतील नव्या बनावाशीं अपरिचित असलेले राजाभाऊ simpleton माधवाप्रमाणं पळ काढतात. ३ — जाऊबाई लंघनाचा घाट घालतात. पण एकदा सैंपाकघरांत येऊन "माझं कांही सहकार्य पाहिजे का? — कोणता तरी एक जिन्नस माझ्याकडे सोपवा" म्हणतात.

बटाट्याची कोरडी भाजी त्यांच्याकडे देण्यांत येते. त्या त्या जिनसाला आवश्यक अशा गोष्टी व स्टोव्ह भांडीं घेऊन त्या आपल्या खोलींत जातात. ४ – मैत्रिणी जमतात.

## अंक तिसरा—

१ – साक्रीकरबाईंच्या अध्यक्षतेखालीं कॅरमचा खेळ सुरू. २ – चिंगूमावशींच्या ताब्यांत सैंपाक घर. त्यांच्या हाताखालीं कुमूद. तिचा संताप व ससेहोलपट. ३ – जिकडे तिकडे कुलपें असल्याची चिंगूमावशीची बोंब ! ४ – मैत्रिणींची कावकाव. डोळे मिचकावीत हास्य ! “धाकट्या जावेवर हा — विश्वास ! हें तिचं स्वातंत्र्य !” ५ कुमूद सगळीं कुलपं (किल्लीनं) फोडते. संतापून बाजूला आदळते ! सैंपाकघरांत कपबशांचा खळखळाट ! ६ – साऱ्या जमतात. चिंगूमावशीच्या सोन्यानं —— कप-बश्यांचं रॅक डोक्यावर घेतलेलं असतं — (म्हणजे तें कारटं तिथं धडपडतं !) चार बशा व तीन कप स्वर्गवासी होतात ! — या नुकसानीची जबाबदारी परिस्थितीवर ! “ उगीच मारूं नका बाई मुलाला — ” सगळ्यांची विनंति चिंगूमावशीला ! —— सोन्याचा गगनाला गवसणी घालणारा टाहो !

## अंक चवथा—

१—जाऊबाईंच्याकडून भाजी तयार होऊन येते. त्या पुन्हा गुहेंत जातात व दार लावून घेतात. २— मैत्रिणींचा खेळांतील गदारोळ. ३— पोळ्याची कणीक जास्त भिजविली गेली म्हणून एवढा मोठा गोळा बाजूला ठेवण्यांत येतो. ४—कुमूदची ससेहोलपट—संताप वाढत्या प्रमाणावर—मनांत चडफडाट—“ बाईंनीं इतकं कांही तुटून वागायला नको होतं— ” ५—सगळ्या जमतात. भोजनाची तयारी. बाईंचं लंघन असल्यामुळं त्यांचा नकार. कुमूदशिवाय सर्वांचीं डाराड्डूर जेवणं. ६ — आणि — अन्न

उरलं दहा माणसं जेवून उठतील इतकं! — भांड्यांचा व खरकट्याचा ढीग त्याला शोभण्यासारखा! — कुमूदच्या सहनशक्तीचा कळस! — पण कुणाला बोलायचं नी काय बोलायचं? — मात्र सारा राग जाऊबाई-वर! — मैत्रिणी हलकट होत्याच! — पण जाऊबाई? — नव्हेच तें! — श्यामा मघाच पसार झाली होती.

## अंक पांचवा

एक

स्वतंत्र

प्रकरण

हवं —

— १० —

## अवदसा आंगणांत आली !

माझं नी माझ्या जाऊबाईचं सरळ नाही, हें माझ्या मैत्रिणींना समजून घ्यायला खड्ड व फळा यांची आवश्यकता राहिलेली नव्हती. माझ्या चडफडण्यानं, नि त्यांत बाहेर पडलेल्या उद्गारांनी तें सिद्ध झालं होतं. ताईनी आपल्या तटस्थ वर्तनानं उरला सुरला संशय काढून टाकला होता.

मेजवानीचा फजितवाडा कसा झाला होता, हें थोडक्यांत दाखवलं आहेच. तरीपण मैत्रिणींनी ढेकरा दिल्या होत्या! — मी पजै जिंकली होती. माझं नाक वर होतं!

हें पण दाखवायचं कुणाला, नी सांगायचं कुणाला? अत्यंत विषण्ण मनानं मागं पडलेला राडा कसा उरकायचा या विचारांत सैपाकघरांत बसून होतें. शरीर मेटाकुटीला आलं होतं. हलवायाच्या घरावर केवळ तुळशीपत्र ठेवून नव्हे तर त्याचीं ताटं लुबाडून तृप्त झालेले भामटे वेदान्ताच्या चर्चेत गुंतल्यास नवल तें काय? स्पष्ट सांगायचं म्हणजे मैत्रिणी विडे चघळीत पसरल्या होत्या. हसणं खिदळणंहि चाललं होतं.

तोंच मला एकदम स्तब्धता झाल्याचं उमगलं! — मी नवल करीत बाहेर आलें. सुगावा घेतला. सगळ्याजणी जाऊबाईच्या खोलींत असल्याचं ध्यानीं आलं. तिकडून बोलण्याचे मिश्र स्वर ऐकूं येत होते.

या बाया तिकडे कशाला गेल्या? — जाऊबाईंनी त्यांना बोलावून घेतलं असेल का? —— कीं याच ढालगजपणानं तिकडे गेल्या आहेत? —— मी आणखी अस्वस्थ झालें. दबत्या पावलांनी खोलीशीं गेलें. दार पुढं केलं असल्यामुळं माझं जवळ जाणं आंत कुणाला समजलं नसावं. मी ऐकूं लागलें.

"आम्ही सांगितलं पाहिजे, असं नाही. पण आपसांतच समजुतीनं विचार केला पाहिजे. मिळतं जुळतं घेतलं पाहिजे नाही का? ——" — सिन्धु पोक्तपणानं म्हणाली.

"खरं आहे ——" बाईंचं शांत उत्तर.

"झालंय् काय," साक्रीकरबाई म्हणाल्या, "कुमुदबाईंना एक विशेष दर्जा प्राप्त झाला आहे. त्यांना आतां तुकारांनी किंवा एकेरी नांवानं संबोधणं बरं नाही दिसत. पोरीबाळींसुद्धा कुचेष्टा करितात —— म्हणून त्यांचा योग्य तो मान आपण साऱ्यांनी ठेवला पाहिजे."

"अगदी बरोबर —" जाऊबाई उत्तरल्या.

प्रमिला म्हणाली, "आणि कुमुदबाईंना अहो जाहो म्हणण्यांत तुम्हांलाहि कमीपणा वाटण्याचं कारण नाही. बरोबरीची जाऊ — पगार मिळविणारी. मान दिला म्हणून बिघडलं कुठं?"

"कांहीच नाही —" जाऊबाईंचे शब्द.

अरुणा म्हणाली, "संसारांत आज कुमुदबाईंचाच मोठा आधार आहे नाही का —"

"त्यांच्या यजमानाची मिळकत घरांतच जमा होते —" जाऊबाई घोगऱ्या स्वरांत म्हणाल्या, "काय समजलं? — तेव्हां तुम्ही हा जो सल्ला देतां आहां तो निःसंशय बहुमोल आहे. — मी यासंबंधीं योग्य तो विचार करीनच."

मी फटींतून पाहिलं. वन्संचे वाभाडे काढतांना त्यांनी जो अवरता

धारण केला होता, त्याचीच पुनरावृत्ति आज झाली होती. आपला आवेग मोठ्या संयमानं दाबीत त्यांनी त्या सर्वजणींकडे पाहिलं. ओठांत किंचित् हसल्याहि त्या! — वीज कडाडण्याची वाट मी पाहूं लागले. 'या सटव्यांनी ही उठाठेव कां केली?' — मी संतापून स्वगत म्हटलं. कान जाऊ-बाईंच्या बोलण्याकडे. फटींतून त्यांचा दिसेल तेवढा चेहरा पाहण्यांत डोळे गुंतलेले.

"आता मी एक प्रश्न विचारूं का? —" बाईंनी शांतपणें विचारलें. पण त्या वाक्यांतील प्रत्येक शब्दांत धग होती. अन् ही गोष्ट त्या बायांच्या ध्यानांत आली असावी. त्या सर्वांनीच मांड्या पालटून तेथून निसटण्याची तयारी दर्शविली.

"हं —" बाई दरडावत म्हणाल्या, "माझ्या प्रश्नाचं कांहीना कांही उत्तर दिल्यावाचून मी तुम्हांला जाऊं देणार नाहीं. बसा मुकाट्यानं. — आता हें मला प्रथम कळूं द्या — कुमुदबाईंच्याबद्दल तुम्ही जी वकिली केलीत, ती तुम्ही आपल्या अक्कलहुशारीनं केलीत कीं, कुमूदच्या सांगण्या-वरून केलीत? — गाढविणींनो, एकमेकींच्या तोंडाकडे काय पाहतां? — कुमुद न् मी जावा जावा आहों. आमचं वैर असेल नाहीतर प्रेम असेल. आमच्या घरची उठाठेव करण्याचं तुम्हांला काय कारण? — आमच्या घरीं येऊन गिळलंत, त्याचे हे उपकार होय? — जा, टवळ्यांनो, एकदम तोंड काळं करा. अन् पुन्हा ध्यानांत ठेवा; माझ्या घराचा उंबरठा चढा, प्रत्येकीचा पाय मोडीन! — आजच्या आचरटपणाबद्दलच तुम्हांला दोन दोन काठ्या लगावल्या तर कांही बिघडणार नाही. पण तितका तुमचा सत्कार करण्याची मलाच इच्छा नाही. जा — एकदम काळं करा —"

जाऊबाईंचं त्या वेळचं स्वरूपच असं होतं कीं, चटकन् काढता पाय घेणं — माझ्या त्या परमप्रिय मैत्रिणींना योग्य वाटलं. माझी वास्तपूस्त न करतां त्या खारुटीच्या चपाळईनं निसटल्या!

"कुमुद, आता तुझी कंबक्ती! —" मी स्वतःला बजावलं! — भिण्यांत अर्थ नाही. मी स्वतःला धीर दिला. सामना द्यायचा निश्चय केला. मी हल्क्या पावलांनी दाराजवळून सरकलें.

जाऊबाई खोलींतून बाहेर आल्या व झोपाळ्यावर जाऊन बसल्या. सैंपाकघराच्या दाराआडून मी पाहत राहिलें. बाईंच्या मुद्रेवरील संतापानं आता गांभिर्याचं रूप धारण केलं होतं आणि तें मोठं भयप्रद होतं. त्यांनी झोपाळ्यावर बसून पाय आंत आखडले. डावा हात पुढ्यांत आडवा ठेवला. त्यावर उजव्या हाताचं कोपर टेकवलं आणि हाताच्या बेचकेंत कपाळ दाबून धरलं. हा प्रकार पाहून माझ्या छातीचे ठोके मलाच ऐकूं येऊं लागले. आधाराकरितां मी भांबावून भोवतालीं पाहिलं. अस्ताव्यस्त सैंपाकघर माझा उपहास करीत होतं.

जाऊबाईंचं घसा साफ करणं ऐकलं. मागून खड्या सुरांत हांक आली "कुमुद — कुमुद, अशी पुढं ये पाहूं — "

मी त्रस्त, चिडलेली व भयभीत होतें. मी धावतच त्यांच्यापुढं जाऊन थांबलें व खेकसत म्हटलं, "हं, ही पाहा आलें! काठीनं झोडपणार कीं वखंटा टाळक्यांत घालणार?"

जाऊबाईंना आश्चर्याचा धक्का बसला. त्या अनिमिष दृष्टीनं पाहत राहिल्या. मी वैतागून म्हटलं, "पाहतां काय, जावेचं कांडांत काढाना!— काठी आणून देऊं? — कीं वखंटा?"

बाई खूप संतापतील व अंगावर धावून येतील अशी माझी कल्पना होती पण तसं कांहीच झालं नाही. त्या उद्वेगानं श्रमल्या. शांतपणें म्हणाल्या, "छीः! — अशी उगींच जाजाऊं नकोस. — तुझा प्रतिकार करण्याचं सामर्थ्य माझ्यांत नाही. — तूं समोरून सुरा घेऊन आली असतीस तर तुझा हात धरण्याचा किंवा जोराचा प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला असतां किंवा आणखी कांही विचार केला असता. पण तसं आज झालेलं नाही

मैत्रिणींच्या आड लपून तूं पाठीकडून सुरा चालविलास व मला असं घायाळ केलंस कीं, माझं मन व शरीर दोन्ही विकल झालीं! कुमूद, यावेळीं मला कसलंच त्राण राहिलेलं नाही —— ”

“ मला हे नाटकी आविर्भाव कळतात, समजलं — ” मी बेभान होऊन म्हटलं, “ तुम्ही मला ताठ्यानं हाक कां मारलीत तें सांगा. मला तुमचं इतर सोंग नकोय् — ”

जाऊबाई आणखी मंदावल्या. त्या खालच्या ओढलेल्या सुरांत म्हणाल्या, “ सांगतें. सोंग न करतां सांगतें. विश्वास ठेव माझ्यावर. तुला त्रास होईल वा तुझा संताप वाढेल असा एकहि शब्द मी बोलत नाही. यापुढं बोलणार नाहीं. कुमूद, तुझ्या मैत्रिणींनी माझ्या गुहेंत येऊन मला छेडली. या पापांत तूं भागीदार किती व त्या कुटाळखोर बायांची लावालावी किती? — हें मला पाहायचं होतं. — थांब, मला शेवटपर्यंत बोलूं दे — पण आता तुझ्या खुलाशाचं कारण राहिलेलं नाही. तुझ्या बोलण्यानं व वागण्यानं मला कळून चुकलं कीं, या साऱ्या भानगडींत खरी अपराधी तुझी ही वडील जाऊ आहे. ”

त्यांनीं एक दीर्घ सुस्कारा टाकला. कांही क्षण जमिनीकडे पाहिलं. नंतर पुन्हां माझ्या दृष्टीला दृष्टी देत त्या म्हणाल्या, “ तेव्हां या चुकीचं प्रायश्चित्त कसं भोगायचं ? — तें माझं मी ठरवितें आणि तुझी जी आंतरिक इच्छा आहे ती शब्दशः पाळतें. कृपा करून थोडी सवड दे. उन्हाळ्याची सुट्टी संपण्याच्या आंत सर्व कांही ठरवून टाकूं. तूं शांत राहा. त्रास करून घेऊं नकोस. आपल्या सांसारिक जीवनांत तसं कांही बिघडलेलं नाही. सारी माया आपण आवरती घेऊं. ” त्या उठल्या व आपल्या खोलीकडे निघाल्या. दाराशीं जाऊन थांबल्या, म्हणाल्या, “ एक विनंती विचारार्थ करून ठेवतें. आपणा दोघींच्या यजमानांना आज घडलेल्या वादळाची कल्पना नाही. बिचारे पुरुष ! निरपराधी आहेत. निरुपद्रवी आहेत. त्यांना

या आगीचे चटके न बसावे. मी माझ्याकडून जपतें. तूं जपशील, चांगलं होईल. यापुढं मी वचन देतें. मी न्याय देणार नाहीं. तुझ्याकडे न्याय मागनि. अद्यापि तुझ्या हृदयांतील चांगुलपणावर माझा विश्वास आहे. देव तुला उदंड आयुष्य देवो, सुखांत ठेवो!" त्यांचा स्वर कातर झाला. त्या खोलींत गेल्या व त्यांनी दार लावून घेतलं!

शब्दांचा मारहि असह्य होऊं शकतो का? —

जाऊबाई माझ्या अंगावर धावून कां आल्या नाहीत? त्यानी माझं मुस्कट कां रंगवलं नांहीं? — त्यांचा संताप असा कसा नाहींसा झाला?

हाहि माझ्याशीं अन्यायच होत नव्हता का?

घरांतील राडा तसा टाकून मी माडीवर धावलें! अंथरुणावर घालून घेतलं. मला अनिवार रडूं आलं!

— ११ —

## ढग पाण्याचा वर्षाव अग्नीचा !

माणसांची विवेकबुद्धि एक अजब देवता आहे. ती आंत कुठं असते तिचं शासन कसं चालतं ? नी तिचं एकंदर स्वरूप कसं असतं — कोणी पाहिलं आहे. पण ती आहे न्यायनिष्ठुर ! — माणसाच्या हातून अपराध घडला रे घडला कीं, तिच्या चाबकाचा फटकारा बसलाच ! तो फटकारा कधी तिरवट असतो, कधी रक्तबंबाळ करणारा असतो. 'मी चुकलों क्षमस्व !' असं माणूस कितीहि कळवळून म्हणो, कशीहि करुणा भाको; विवेकबुद्धीच्या राजशासनांत सवलत नाही ! सदयताहि नाही ! अपराधाची शिक्षा ठरलेली ! — आणि यांतून निर्माण झालेला पश्चात्ताप !! किती अस्वस्थ करणारा असतो ! — बाहेर कांही दिसायचं नाही. दुसऱ्याला कांही समजायचं नाही. पण आंत ? — केवढी धग निर्माण होते ! — किती दाहक असते ती ! — अशा अवस्थेंत कोठूनहि सहानुभूतीचा गारवा लाभण्याची सोय असूं नये. आशाहि असूं नये. या दैन्यावस्थेला तोड नाही.

त्या रात्रीं मी हा अनुभव घेतला. एका विलक्षण एकाकी जीवनांतून गेलें मी. आज तो प्रसंग आठवला म्हणजे वाटतं, आपण त्यांतून निभावलों कशा ?

जाऊबाईशीं मी अत्यंत अन्यायानं वागलें होते यांत शंकाच नाही. पण त्यांनी 'तूं पाठीमागून सुरा चालविलास' हा जो आरोप केला होता, तो तितका खरा नव्हता. माझ्या मैत्रिणींनी जो फाजीलपणा केला, त्याला माझी अनुमति होती का?— नाही. त्यांनी माझा कैपक्ष घेऊन, जाऊबाईंच्याकडे जावं नी त्यांना छेडावं, असं मी दर्शविलं नव्हतं; सांगितलंहि नव्हतं. पण त्या बायांनी हा आगलावेपणा कां केला?-- कोण जाणे!

छे:!— मला कबूल केलं पाहिजे: मी त्यांच्या हातीं चूड दिली होती! अप्रत्यक्ष माझी अनुमति होती!

माझ्या आघातानं जाऊबाईंचं शरीर नी मन दोन्हीं विकल झालीं! त्यांच्यांत त्राण राहिलं नाही. म्हणून त्या संतापल्या नाहीत!— मला शासन करण्याचं त्यांनी मनांत आणलं नाही. — खरं असेल हें. पण मी सुटलें का शासनांतून?— नाहीं. विवेकबुद्धीनं आपला फटकारा अचूक लगावला!-- झटक्याला तरी मी निपचित पडलें.

या अवस्थेंत यजमानांची सहानुभूति मागणं व मिळवणं अशक्य होतं. नी त्यांना काय सांगूं शकत होतें?— त्यांत त्यांचा प्रकृतिधर्म. मी सुस्कारा टाकला, विवळलें, दुःख सांगितलं तर त्यांचं लक्ष जायचं. एरव्हीं त्यांचं वर्तन असं: तूं नी तुझं जीवन!— वाटेल तो गोंधळ घाला.— बरं, याच्याउलट मी त्यांना घडलेला प्रकार सांगितला असता तर? छे!:— मला कल्पना करवत नाही, ते माझ्याशीं कसे वागले असते! कारण ही गोष्ट, त्यांना मातेप्रमाणं पूज्य असलेल्या भावजयीसंबंधीं होती. त्यांनी एकंदर वस्तुस्थितीचा कसा विचार केला असता, कोण जाणे. अन् जाऊबाईंचं सांगणं "ही भानगड पुरुषापर्यंत न नेलेली बरी." याला कारण तसंच कांही असावं. असो.

यांत खरी धन्यता जाऊबाईंच्या शांतपणाची!— घरांतलि शिस्त

एवढी बिघडली तर खसकन् अंगावर येणारी, तिचा शब्द खालीं पडला कीं, प्रत्यक्ष पतीला दटावणारी आणि उणादुरा शब्द ऐकला कीं, फणा उभारणारी ती नागिणि, मी तिला पूर्ण छेडली असतांहि, खवळली नाही, कीं धुमसत राहिली नाही! केवळ शांतिब्रह्म तिच्या ठिकाणीं अवतरलेलं दिसलं!

माझ्या मूर्खपणानं घरांत निर्माण झालेला राडा जाऊबाईनी मुकाट्यानं आवरला. पुरुष घरीं येतांच जणु कांही आमच्या मेजवानीचा प्रसंग घडलाच नाही, इतका धिमेपणा त्यांनी दाखविला. गुप्तपणा राखला. आमच्या धांगडधिंग्याला जवळचा एक साक्षीदार म्हणजे श्यामा! तिनं अजाणतेपणानं कपबश्या फुटल्याचा उल्लेख केला. पण तिचं बोलणं पुरं होण्याच्या आंत त्यांनी "श्यामा, कांहि गोष्टी मुलांनी बोलायच्या नसतात अं." एवढं बजावलं. श्यामा उमगली.

याशिवाय त्यांनीं ताकास तूर लागूं दिली नाही. तेंच खेळकर वातावरण तीच शिस्त, तेंच बोलणं चालणं त्यांनी टिकवलं! राग व अपमान गिळण्याचं त्यांचं हें सामर्थ्य मला त्यावेळीं भारी आश्चर्यकारक वाटलं. आजहि तो काळ, तो प्रसंग आठवला म्हणजे वाटतं, ताई एका सामान्य कुटुंबांतलि गृहिणी असल्या तरी सौजन्यांत त्यांची पातळी निःसंशय उंच आहे.

ती रात्र गेली आणि पुढचे दिवस असेच भराभर येऊं जाऊं लागले. कालाची निरवानिरव नित्याप्रमाणं होत राहिली. आमचं कुटुंब काय, हजारांपैकीं एक. त्याचं जिवन तशाचं वेगांत चालू राहिलं. माझं व्यक्तीचं जीवन, त्याला महत्त्व तें काय?

माझं अपराधी मन थोडं थोडं धिट बनत गेलं. त्याच्या ठायीं निर्माण झालेली खंत तितक्या प्रमाणांत कमी झाली. घडलेल्या प्रकारची जाणीव जाऊबाईंनी अल्पांशानं दिली नाही. आणि मला कांही बोलण्यास त्यांनी

संधि दिली नाही. मी कांही बोलणार असं समजतांच त्यांनी किंचित् हसत म्हटलं, "ती गोष्ट कालाच्या जमाखर्चीत नोंदली गेली. तें खातं बंद झालं. आतां त्याची वाटाघाट कशाला?— पुन्हा तसं कांही न होईल याला मी जपणार आहेंच. चुकांपासून बोध घ्यावा. उगीच ती गोष्ट उगाळूं नये."

मला यावर जास्त बोलण्याचा धीर झाला नाही. त्यांत शाळेंतील कामाची व्यग्रता मला उपकारक झाली. उन्हाळयाच्या सुट्टीचा ध्यास विद्यार्थ्यांप्रमाणे शिक्षक वर्गाला लागलेला होताच. मुलांच्या परीक्षा, वह्या तपासणं, ऑफिस वर्क यांची झिंमड उडाली होती व चक्राचे ते फेरे घेत राहणं मला आवश्यक होतं. शाळेंतील कोणत्याहि कामांत अंगचोरपणा करायचा नाही, हा माझा स्वभावधर्म होता व तेंच माझं पुण्य होतं.

घडून गेलेल्या प्रकारानंतर माझ्या मैत्रिणींची प्रतिक्रिया काय झाली, इकडे मात्र मी अगदी दुर्लक्ष केलं. त्यांच्यापैकी कोणीहि विशेष उच्चल केली नाही. माझ्याशीं त्यासंबंधीं बोलण्याचा प्रसंग आणिला नाही. त्यांचा मार्ग त्यांना, माझा मला असं घडलं.

याचा अर्थ असा मात्र नाही कीं, मी मनांतून प्रसन्न होतें, किंवा घडलेल्या प्रकाराचं मला विस्मरण पडत चाललं होतं. नाही. तसं सुतराम् झालं नाही. जाऊबाईंच्यासमोर मी त्यांची अपराधी म्हणून लज्जित होतें व फावल्या वेळीं मनात असंहि येत होतं कीं, आपल्याकडून घडलेल्या दोषाचं कांही परिमार्जन व्हावं. पण तितकं मनोधैर्य मात्र मला दाखविण्याचं साधलं नाही. इंग्रजी शिष्टाचारांत Thank you आणि Please या शद्बांमध्ये जो औपचारिक भाग आहे, तसाच तो Forget & forgive याला आहे. मी या पद्धतीनं दोषमुक्त होऊं पाहत होतें. जाऊबाईंनी ही गोष्ट ताडली असावी. आणि म्हणूनच त्या मला ती संधि देण्यास तयार नव्हत्या. त्यांना तो ओठापुरता असणारा उपचार नको होता. एवी तेवी लाथ

बसली. तिचं निवारण करतां आलं नाही. मग आता मागाहून तीकरितां मिळणारा नमस्कार तरी कशाला घ्या. असं त्यांनी मनाशीं ठरवलं असावं.

माझ्या हृदयाला चाटून जातील, अशा आणखी दोन गोष्टी – केवळ मलाच जाणवतील अशा — घडत होत्या. पहिली गोष्ट म्हणजे बाईंचं माझ्याशीं होणारं बोलणं चालणं व एकूण वर्तन. पूर्वी त्या मजवर एक प्रकारचा अधिकार गाजवीत होत्या. मला वचक बसावा अशी त्यांची भाषा होती. एकेरी नांवानं संबोधणं नी दरडावून हुकूम करणं त्या सहज करीत. श्यामा तशी मी. पण आता हें सारं बदललं होतं. अद्याप त्या एकेरी नांवानंच संबोधति; पण पूर्वीच्या कुमूद या नांवाला ताई हें उपपद जोडण्याविषयीं त्या दक्षता घेत होत्या आणि बोलण्यांत एक प्रकारची नम्रता दाखवीत होत्या.

पूर्वकालीं, "कुमूद, सैंपाक तयार आहे. पानं घे पाहूं. पुन्हा सांगणार नाही अं —" असं दटावणं.

आज "कुमुदताई, जेवायला येतेस. पानं घेऊं?" असं विचारणं. बरं यांत उपालंभ होता का! — नाही. ज्यांच्याशीं आपला परिचय नाही किंवा ज्याच्यावर आपला अधिकार चालत नाही, त्याच्याशीं आपण कसा औपचारिक भला भाव दाखवितो, तो प्रकार जाऊबाईंनी माझ्या बाबतींत अवलंबिला होता.

आमच्या घरांतसुद्धा कोणाच्या ध्यानीं हा फरक आला नाही. पण मला रुचला का तो? — नाही. मला चुकल्याचुकल्याप्रमाणं वाटूं लागलं. जाऊबाईंच्या कृपेपासून आपण दूर झालों, त्यांच्या मनांतून आपण उतरलों, ही गोष्ट मला विचित्र वाटूं लागली. बोचकहि झाली.

बाईंच्यामधील दुसरा फरक — कीं जो मलाच आकळतां येईल — असा होता कीं, त्या मधूनमधून मोठ्या विचारी — गंभीर — कांहीशा सचिंत होत होत्या. ही वस्तुस्थिति कोणाला न उमगावी म्हणून त्या

भारी जपत होत्या. आताहि त्या यजमानाशीं, दिराशीं, मुलाबाळाशीं हसून खेळून बोलत होत्या. माझ्याशीं थट्टाविनोद करीत होत्या. पण त्यांत त्यांचं अंतःकरण बहुशः नव्हतं. एखादी मोलवान् व उपयुक्त वस्तु हरवली म्हणजे माणसाला जसं चुकल्याचुकल्याप्रमाणं होतं व ती वस्तु कुठं चटकन् दिसेल का, अवचित कुठं सांपडेल का, असं मानून तो सर्वत्र शोधक दृष्टीनं पाहत असतो, तशी जाऊबाईंची मनःस्थिति झाली होती. त्यांचं कांही हरवलं होतं व तें परत सांपडणं कठीण असं त्यांना वाटत होतं.

त्यांची ही अवस्थाहि मला जाचक झाली.

पण याला उपाय? — या प्रश्नानं मी मूढ बनलें होतें. — आणि अशा मुग्धावस्थेंत माझ्या मनाला एक निराळी कलाटणी मिळाली. एक नवा विचार मला सुचला.

माझं थोडं निढावलेलं मन मला म्हणालं, "तूं स्वतःला जितकी दोषी समजतेस, तितकी तूं नसली पाहिजेस. नाहीतर तुझ्या जावेनं तुला असं सरळ सोडलं नसतं. — याच्या उलट, तुझ्या जावेच्या अरेरावी स्वभावाला प्रेमापेक्षा आढ्यतेचा आधार असणंहि कांही अशक्य नाही. त्याशिवाय ती एकदम नरम पडली कशी? —अर्थात् तिला हें स्पष्ट झालं असावं कीं, जर कुमुदला दुखवली व त्याचा परिणाम म्हणून ती व तिचा नवरा वेगळं राहण्याची गोष्ट बोलूं लागली तर? — आपला प्रपंच कसा चालणार? — हें भय तुझ्या जावेला पडलं असावं."

साशंक व कलुषित असलेल्या माझ्या मनानं जाऊबाईंच्या वागण्याचा हा जो नवा अर्थ लावून दाखविला तो मला पटला. स्वतःच्या दोषाचं स्वरूप सौम्य करण्याकरितां मी स्वतःला आणखी म्हटलं, खरंच आहे. जाऊबाईंना असला कांही विवेक केल्यावाचून गत्यंतर नाही. नवरा पंगू, चार मोठी होत चाललेली मुलं, त्यांचीं शिक्षणं व्हायचीं, स्वतःचं आयुष्य जायचं.

त्यांत टुमदुमीत राहण्याची सवय जडलेली. मिळवत्या दीर जावेपासून वेगळे झालों तर जमायचं कसं?— असं जाऊबाईंना संकट पडलं असलं पाहिजे. त्याशिवाय त्या अशा नरमायच्या नाहीत. त्यांनी वडील जावेचा दिमाख कां दाखविला?— दाखवतां आला म्हणून. मऊ सापडलं कीं, कोपरानं खणूं लागायचं असा माणसाचा स्वभावच आहे.

मग मी थोडी न्यायनिष्ठुर होऊन स्वतःकडे पाहिलं नी निकाल दिला: आपण कांही विशेष चुकलों नाहीं. आपल्या अधिकाराविषयी जागृत झालों एवढंच. आता ही गोष्ट थोड्या निराळ्या मार्गानं घडायला पाहिजे होती. मैत्रिणींचा चोंबडेपणा चालूं दिला हें थोडं गैर झालं.— बाकी विशेष कांही बिघडलं नाही. घरोघरीं— त्याच परी. भावांभावांनी एकत्र कुटुंब करून राहण्याचं ठरविल्यावर त्याचा शेवट केव्हातरी असा व्हायचाच. कुठं पुरुषांत खळबळ व्हायची तर कुठं बायकाबायकांत जमायचं नाही. तात्पर्य काय, रायकर बन्धूंनी जमण्यासारखं असलं, एकत्र राहावं. नांही जमलं, वेगळं व्हावं. यांत जगावेगळं काय आहे?

संशय हा झोटिंग महा! त्यानं ही अशी माया रचली! मला ती खरी वाटली. मी स्वतःला क्षमा करूं लागलें. दर दिवशीं मी स्वतःकडे दोषांचा वाटा कमी कमी घेऊं लागलें.

आज मला या साऱ्या प्रकारांचं उद्वेगजनक हंसूं येतं. वाटतं, काय माणसाच्या मनाची व स्वभावाची रचना आहे!— स्वतःकडून दोष घडतांच तो किती भ्याड, सलज्ज व दुबाळ असतो?— पण तो दोष दूर सारण्याची युक्ति त्याला सापडली तर?— तो त्या काडीचा आधार घेतोच.— कुमुद रायकर तेंच साधत होती.

मग तिनं ठरवून टाकलं: जाऊबाईंनी फणा उभारली, बडगा दाखवायचा. नाही उभारली: संसार सांभाळायला आपल्याला कोणी पाहिजेच.

माझ्या मनाची अशी तयारी होऊन मी, बाई पुढं कशा वागतात व

काय करितात – इकडे लक्ष लावलं.

उन्हाळ्याची सुट्टी सुरू झाली.

आम्हां दोघींत दुजाभाव निर्माण होण्यापूर्वी आम्ही सुट्टीसंबंधींचे कांही विशेष बेत केले होते. पण आता त्यांतलि आत्मीयता नष्ट झाली होती. आधी बाईंनी चार आठ दिवस जाऊन परत यायचं. तोंपर्यंत मी संसार सांभाळायचा. माझी आई राहण्यास आली बरंच झालं. सैपाकघराचा त्रास चुकेल. नंतर बाई परत येतील. आपण मुंबईला आपल्या बहिणी व मैत्रिणी यांच्या मेळाव्यांत निघून जायचं! अगदी सरळ सरळ कार्यक्रम. त्याप्रमाणं जाऊबाईंनी प्रयाणाची तयारी केली. थोरला मुलगा माधव व धाकटीं जुळीं भावंडं मधु-माधवी यांना घेऊन त्या निघाल्या. जातांना त्या विशेष कांही बोलल्या नाहीत. मीहि कांही विचारलं सवरलं नाहीं. त्या गेल्या. मागं आम्ही राहिलों चौघं. मी, हे, श्यामा व अप्पा!

यानंतर दोनच दिवसांनी आई आली. माझ्या मनासारखं झालं. संसाराची एक वेगळी चव मी अनुभवूं लागलें.

माझा विवेक कुठं अज्ञात स्थळीं जाऊन दडला होता व कलुषित झालेल्या बुद्धीनं मला प्रशंसापत्र दिलं होतं: "तूं कोणी सामान्य स्त्री नव्हेस. कर्तृत्ववान् थोर स्त्री आहेस." अर्थात् ही गोष्ट मी आपल्या जन्मदात्या आईला समजावून देणार नाही तर कोणाला? त्यांत सुसंधि अशी: जाऊबाईंचं दडपण नव्हतं. माझी मी मिळवती — स्वतंत्र होतें. पगारहि आला होता. लेकीचं कौतुक करण्यास आईला मोठा वाव मिळणार होता. इकडे जा, तिकडे पळ सांगण्यास श्यामा होती.

इंद्रपद हातीं आलं होतं म्हणाना.

पाल्हाळ नको म्हणून तीन अंकाचं नाटक सागतें.

**अंक पहिला—**

घर आईच्या व श्यामच्या अंगावर टाकून कुमूद रायकर टी. डी.

सेक्रेटरी महिलामंडळ, अध्यक्ष - बालविकास मंदिर इत्यादि धावपळ सुरू करतात. महिला मंडळांत सात दिवसाची वसन्त व्याख्यान-'माला चालू करणं. बाळ गोपाळांकडून बसविलेला एक नाट्यप्रयोग करून दाखवणं. हरिजन स्त्रीवर्गांत साक्षरता प्रसाराची मोहीम. महात्मा गान्धीजींना श्रद्धांजली म्हणून ग्रामसफाई व सूतकताई याचा एक वर्ग काढणं. इत्यादि इत्यादि इत्यादि इत्यादि इत्यादि.

**दुसरा प्रवेश** — हें सारं आईला दाखविण्याकरितां तिची टांग्यांतून मिरवणूक.

**तिसरा प्रवेश** — कुमुद रायकरांना भेटण्याकरितां या बाया आल्या, ते पुढारी आले. इकडच्या मुली जमल्या. तिकडे मुलं गोळा झालीं! — बाहेरगांवच्या व्याख्यात्यांचीं पत्रं आलीं. मासिकांनी लेख मागितले. छे छे छे! कामाचा केवढा हा डोंगर! पण शाबास मिसेस रायकर यांची! — सारीं कामं उरकीत होत्या.

— (कारण, प्रत्यक्ष करायचं असं कांहींच नव्हतं.) छे, आज तर चमत्कारच झाला! — त्या मुनसबीणबाईंनी – कुमुदताईंची तारांबळ होऊं नये व दगदग पडूं नये म्हणून सकाळीं स्वतःची कार धाडली! फक्त दीड दोन ग्यालन पेट्रोल ब्लॅकमार्केटनं कुमुदताईंनीं घालायचं नी खुश्शाल तास दोन तास मिरवायचं. कुमुदनं मुनसबीणबाईंचं पत्र आईपुढं करून तिला आश्चर्यांत पाडलं!

(पड्यांत — पेट्रोल घातल्यानंतर दोन ठिकाणीं कुमुद आईसह जाऊन आली! — लागलीच मुनसबसाहेबांना गाडीचं काम लागलं! कारची श्रीमंती आली तशी गेली! कुमुदचे अवघे दहाच रुपये गेले!) थोरामोठ्यांचा लोभ संपादावा लागतो याकरितां. कुमुदनं आईला हा धडा समजावून दिला. आई कांहीं बोलली नाहीं. पण आपल्या पोरीला कामाचा इतका उरक कसा? — या आश्चर्यानं स्तंभित झालेली दिसते.

**अंक दुसरा**

कुमुदताईच्या वटवटीचं एरंड गुऱ्हाळ! — मी मिळवतें. यजमान मिळवतात! यामुळं एवढा मोठा संसार चालला आहे! — जाऊबाईंना याची पूर्ण जाणीव आहे. त्या कुमुदच्या अर्ध्या वचनांत असतात. कुमुदचीं बाहेरचीं तंत्रं सांभाळण्याकरितां त्यांना भारी दक्ष असावं लागतं. त्या मर्जी सांभाळून असतात! इत्यादि.

**अंक तिसरा**

आईला येऊन चार दिवस झाले आहेत. कुमुदच्या कार्यांचे कागदी घोडे थै थै नाचत आहेत. वर्तमानपत्रांत एखादी टिमकी वाजते आहे! कार्याची खरी दिल्ली बहोतहि दूर – दूर है! — डॉक्टरांचंच म्हणणं पडलं: इतकी दगदग कामाची नाहीं. कुमुदताईंनी थोडी विश्रांति घेणं आवश्यक आहे. कार्यं थोडीं लांबणीवर पडलीं तरी चालतील. श्यामासुद्धा म्हणाली, "काकू, तूं इतकी दगदग करूं नको ग."

**प्रवेश दुसरा** — साक्रीकरबाई आल्या. मैत्रिणी आल्या. त्यांनीसुद्धा आईला सांगितलं. "कुमुदला कांही सांगा. समाजाकरितां झटायचं, त्याला कांही सीमा?"

आई आश्चर्याच्या कोंडींतून बाहेर निघेना.

**प्रवेश तिसरा** — झालं! कार दिलेल्या साहेबांची बदली होणार म्हणे. त्यांना बढती मिळाली आहे. त्यांचा नी राजाभाऊ रायकर.B. A., LL. B. यांचा केवढा तरी स्नेह. त्यांना एखादी छोटी ॲट होम देणं आवश्यक. कोर्टांतील इतर चार प्रतिष्ठित माणसं येणार. कांही वकील बोलवावे लागणार. साक्रीकरबाईंचा सल्ला हवा. चिंगू मावशींना साह्याला बोलावलं पाहिजे. आतां आई आहे. तितकी उधळमाधळ व्हायची नाही.

(पडद्यांत — चिंगूमावशी पोरस्यासह आल्या. आईशीं गोड बोलल्या. पण इतर बाबींत त्या ठमाईनं आईला हूं कीं चूं करूं दिलं नाही. परस्थानीं आलेली ती पोक्त बाई. घर लेकीचं पण त्याची वरात चिंगूमावशीच्या

मर्जीवर. त्या माऊलीनं जाणलं: गप्प बसण्यांत मान राहील. लेकीचं कर्तृत्व पाहून ती गारेगार झाली होती.)

## एकदम बदलता देखावा

वेळ पहाटे पांचची. अप्पांना या वेळीं थोडा गरमागरम चहा लागे. अर्थात् काठीच्या आधारें लंगडी घालीत ते पाकगृहांत आले. पाहतात तों काय, काल घडून गेलेल्या मेजवानीचा गोपाळकाला सर्वत्र पसरलेला — करतो काय बिचारा! — लंगडत त्यानं थोडी आवराआवर केली. तोंच चपापून उठलेली श्यामा आली. तितक्यांत आले राजाभाऊ! प्रत्येकानं स्वतःच्या मनाशीं सध्याच्या गृहकर्त्रीच्या गुणाचं कौतुक करीत सैंपाकघर आवरलं! — राजाभाऊंनी स्टोव्ह पेटवला. श्यामानं चहा करण्याची उपकरणीं आणून दिलीं. एकमेकांशीं विनोद करीत अप्पा पद्धतशीर चहा करण्यांत गुंतले. लेकीला जवळ बसवून ते म्हणाले, "श्यामा, एकादं पद म्हण पाहूं —"

श्यामा गोड गळ्यावर म्हणूं लागली.

सैंपाकघरांतील गडबड ऐकून प्रथमतः कुमुदची आई जागी होते. उठून बसते. नवल करीत कान देते. जवळच कुमुद निजलेली असते. तिला हलवून जागी करते.

गाण्याचे सूर ऐकूं येतात—

**आम्ही काय कुणाचे खातो —**
**तो राम आम्हांला देतो —**
**बांधिले किल्ल्याचे तट, तयाला फुटती पिंपळ वट!**
**तेथें पाणी कोण घालितो।**
**तो राम आम्हांला देतो॥**

कुमुद आईला म्हणते, "श्यामा अप्पांना चहा करून देत असेल. पोरीचा गळा कितीं गोड आहे, नाही?"

आई गंभीरपणें म्हणते, "पदहि किती लक्षांत घेण्यासारखं आहे."

- १२ -

## भागील नाटकाचें भरतवाक्य

[ पात्रें :— मी व आई. दुपारीं तीनचा सुमार. श्यामा आपल्या वडि-लांच्या जवळ गप्पा मारीत बसली आहे. तिचे चुलते आपल्या माडींत आम्ही माय लेकी झोपाळा असलेल्या भागांत ]

आमची विश्रांति आटोपली होती. पण जांभया येत होत्या. सुस्ती होतीच थोडी. मी एका स्थानिक साप्ताहिकांत आलेल्या स्वतःच्या योजिलेल्या कामाचा अहवाल वाचीत पडले होतें.

आई जवळच होती. ती उठून बसली होती व एक पुस्तक चाळीत होती. आज सकाळपासून तिचं कांही बिनसलं असावं. ती अगदी मुग्ध होती व मोजक्या शब्दांत बोलत चालत होती. तिच्या या मुग्धतेचं कारण जाणून घेण्याचा मी विशेष प्रयत्न केला नाहीं. माणसाला येते एखादी mood. मी निदान ठरवून टाकलं.

स्वतःच्या कार्यक्रमाचं स्थानिक पत्रांत आलेलं वर्णन आईच्या नजरेस आणावं म्हणून मी उठून बसले व पत्र आईपुढं टाकीत म्हटलं, " हें वाच-लंस कां तूं ? "

आईनं पुस्तक बाजूला ठेवलं व चष्मा काढून हातांत घेत ती म्हणाली, " कुमुद, उद्या सकाळच्या आठच्या गाडीनं मी परत जाण्याचं ठरवलंय्—"

मी पुढं केलेल्या पत्राकडे तिनं पाहिलसुद्धां नाही. मी तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून तिला विचारलं, "कां ग आई, आज तुला राग कसला आलाय एवढा ?"

आई तुच्छतादर्शक स्वरांत म्हणाली, "राग बीग मी कांही जाणत नाहीं. — उद्यां सकाळच्या गाडीनं मी जाणार हें नक्की."

मी मनांत थोडी चरकलें. आईचा राग कां बरं झाला असावा ? मी स्वतःच्या मनाशीं बोललें. बाह्यतः मी नवल दर्शवीत आईला म्हटलं, "म्हणजे ? — तूं पंधरा दिवस राहण्याच्या विचारानं आलीयस् ना ? अद्याप आठ दिवससुद्धा झाले नाहीत तुला येऊन —"

आई सरळ माझ्याकडे पाहत म्हणाली, "तुझ्या इथं राहण्यांत कांहीच अर्थ नाही असं मला वाटतं."

मी चाचरत विचारलं, "म्हणजे ? – तुझ्या बोलण्याचा अर्थ नाही कळला मला —"

"नाही कळायचा." आई म्हणाली, "अति शहाणा त्याचा बैल रिकामा — अशी तुझी स्थिति आहे. तूं भानावर असशील तर ना ! — मूर्ख पोरी, मी तुझ्याकडे आलें, ती तुझा संसार पाहण्याकरितां. गृहिणी या नात्यानं तुझं कर्तृत्व पाहावं नी तुला आशीर्वाद द्यावा, या हेतूनं मी आलें. तुझी जाऊ सुगृहिणीचा एक सुंदर नमुना आहे. तेव्हां तिच्या हाताखालीं तूं किती तयार झालेली आहेस, हें मला पाहायचं होतं. म्हणून मी मोठ्या आशेनं आलें होतें. पण तूं मला काय दाखवलंस ? — स्वतःच्या सार्वजनिक कामाचा तमाशा ! —"

आईचा आरोप मला अपमानकारक वाटला. मी स्पष्ट स्वरांत म्हटलं, "सार्वजनिक कामाचा तमाशा चालवला आहें मी ?"

"शंका आहे का ? —" आई कठोर स्वरांत म्हणाली, "स्वतःचा बडेजाव दाखविण्यांत वा करून घेण्यांत तूं किती गुंग आहेस, याची तुला

शुद्ध नाही. येथलि एका साप्ताहिकांत तुझ्यासंबंधीं वा तुझ्या कार्यासंबंधीं आलेला गौरवपर मजकूर, ही काय तुझी खरी प्रशंसा आहे ?—अगदी सहज घडणारी गोष्ट आहे ती. पण तुला वाटूं लागलंय्,— आपण कोणी खरंच मोठ्या आहों !— पण हें थोरपण तुला किती महाग पडलंय्, याची तुला शुद्ध आहे का ? मुनसबसाहेबांकडून आलेली कार तुला फुकटांत पडली असेल नाही का ? अन् चिंगू मावशीच साह्य ?— कांही मनाची लज्जा असेल तर पाहा विचार करून.— अशी रागारागानं काय पाहतेस माझ्याकडे ? मी तुझी आई चार दिवस पाहुणी म्हणून तुझ्याकडे आलें. तुला वाटलं, बरी स्वैपाकीण मिळाली ! —"

"आई—" मी ओरडून म्हटलं, "किती घाणेरडा आरोप करतेस माझ्यावर !—"

"मग काय इथं आल्याबरोबर शहाण्या लेकीनं सैंपाकाचा राज्यकारभार माझ्याकडे सोपवला म्हणून तुझे आभार मानूं ?—" आई रागानं म्हणाली, "स्वतःच्या मनाला विचारून पाहा—माझ्यावर सगळं टाकून गांवांत भटकायला तूंच गेलीस ना ? — रोज संध्याकाळीं मला घेऊन चार ठिकाणीं मिरवलीस; प्रण ते मला कांही दाखवावं म्हणून नव्हे. तर स्वतःचा बडेजाव आईच्या डोळ्यांत भरावा म्हणून. — मधे बोलूंच नकोस तूं. गेल्या चार दिवसाचा तुझा दिनक्रम मी पाहिला आहे. संसारी स्त्रीला शोभण्यासारखं असं मला कांही एक आढळलं नाही – "

मी काय बोलणार ?—जन्मदात्री आईच मला नालायख ठरवीत होती. मी दुबळेपणानं विचारलं, "एकूण संसारांत माझं मुळीच लक्ष नाही असं तुझं म्हणणं ? —"

"मला नको विचारूं —" आई छातीला हात लावीत म्हणाली, "आपल्या अंतरात्म्याला विचार. — सार्वजनिक काम करण्याचा टेंभा पाजळला आहेस, तो बाजूला टाकून स्वतःकडे पाहा. तुझी तुला शरम

वाटेल. — जिला स्वतःचा संसार सांभाळतां येत नाही, तिनं सार्वजनिक कार्य करण्याची वटवट करणं यासारखी मूर्खपणाची व तिरस्कार वाटण्यास योग्य अशी दुसरी गोष्ट नाही."

आईनं मर्मावर बोटं ठेवीत फटकारा लगावला होता. मला तिच्या तोंडाकडे पाहण्याचं धैर्य होईना.

आईनं पुढं झुकून माझ्या उश्यालगतचं एक मासिक ओढून घेतलं व त्याचीं पानं चाळीत ती पुढं म्हणाली, "तूं किती आंधळी व स्वयंशिष्ट आहेस, याचं तुला एक प्रात्यक्षिक दाखवूं का? — हें पाहा. या मासिकांत सार्वजनिक कार्यासंबंधीं एक चुटका सबन्ध पानभर ठळक अक्षरांत दिला आहे. — हा वाचला आहेस कां तूं? — माझी खात्री आहे, तूं त्याच्याकडे पाहिलंसुद्धा नसशील. अन् गंमत ही आहे कीं, तुझं लक्ष जावं म्हणून तांबड्या शिसपेन्सीलीनं त्याला चौकट केली आहे कोणीतरी—"

आईनं माझ्या पुढ्यांत तें मासिक पसरून ठेवलं. ती पुढं म्हणाली, "एकदा वाचच तूं."

मी फरकन् मासिक आणखी पुढं ओढलं व तो चुटका मनांतल्या मनांत वाचला. रागें रागें वाचला.

## सार्वजनिक कामाचा खेळखंडोबा.

"स्वातंत्र्य मिळाल्यानंतरहि आमच्या मातृभूमीची दुर्दशा चालू आहे, याचें कारण आमची सार्वजनिक कार्य करण्याची अपात्रता होय. वाटेल त्याने उठावें, देशकल्याणाच्या वा लोककल्याणाच्या गप्पा माराव्या. हवें तसें नाचावें, मतें न जुळण्याऱ्या लोकांचा वा पक्षाचा द्वेष करावा आणि आपल्या वेळेचा व (जमल्यास) लोकांकडून मिळालेल्या द्रव्याचा अपव्यय करावा हा प्रकार सर्वत्र आढळतो. समाजाच्या वरच्या थरापासून खालच्या थरापर्यंत आढळतो! स्वार्थापलीकडे दृष्टी नाही. स्वतःचे ढोल नगारे वाजविण्यापलीकडे दुसरा उद्योग नाही, शब्दावडंबर माजवून भोळ्या लोकांच्या

डोळ्यांत धूळ फेकण्यापलीकडे कार्य नाही आणि द्वेषमत्सराची धूळ उधळण्याशिवाय हेतु नाही; ही आमची काम करण्याची पद्धत आहे. म्हणून आमच्याकडे कार्यकर्ते पुरुष नी कार्यकर्त्या स्त्रिया यांच्या झुंडीच्या झुंडी दिसत असतां प्रत्यक्ष कार्य शून्यांत जमा असतें!— कार्यनिष्ठा, कर्तव्यतत्परता, त्यागबुद्धि व लोकहिताची तळमळ या गुणांची आम्हांला ओळख नाही. चाडहि नाही. भपकेदार योजना आंखाव्या, कार्याचा पसारा मांडावा आणि उगीच धावपळ करावी! हा सर्वांचा खाक्या आहे. आपण प्रत्यक्ष कार्य किती करतो वा करूं शकतों, आपली कुवत किती आणि आपण कोणत्या पायरीचे आहों, याची दखल आम्ही घेतच नोंहा. उठावें. शिंग फुंकावें. गर्जना करावी. संपलें! कार्यकर्त्यांचें जणूं पेंढार फुटलें आहे! — खरोखर या गर्दीत शेंकडा दोन प्रमाणांत कार्यकर्ते निघतील तर कामाचे डोंगर उभे राहतील व देशाची स्थिति सुधारल्यावाचून राहणार नाही! — पण दुर्दैवच असें: कार्यकर्त्यांचा अभाव! याचमुळे आम्ही घसरगुंडीकडे आहों. डोंगर चढणीकडे नाहीं."

वरील उताऱ्यांत जाणत्या माणसाला नाकारण्यासारखं काय होतं? मला आंतल्या आंत चिमटा बसला. मी ओशाळलेल्या दृष्टीनं आईकडे पाहूं लागतांच तिनं माझ्या हातांतील मासिक काढून घेऊन बाजूला टाकलं. नंतर तिनं विचारलं, "हा उतारा तांबड्या पेन्सिलीनं कुणी रंगविला आहे, माहीत आहे?— तुझ्या यजमानांनीच असला पाहिजे. तुझे कान अप्रत्यक्ष उपटण्याकरितां —"

"आई, –" मी केविलवाणें म्हटलं, "काय बोलतेस तूं हें!— त्यांच्या प्रोत्साहनानं तर मी या भानगडीत पडलें —"

आई मान उडवीत तुच्छतेनं म्हणाली, "हें म्हणणं अगदी खोटं नसेल पण तितकं खरंहि धरतां येणार नाही. कुमुद, तुझा नवरा एक सामान्य संसारी मनुष्य आहे. कोणी बडा कार्यकर्ता नव्हे किंवा स्वतःच्या

संसाराला तुच्छ लेखून लोककार्याला वाहिलेला पुढारीहि नव्हे. — सरळ-पणें चालणारा संसारी माणूस. होतकरू वकील आहे. हळू हळू त्याला समाजांत प्रतिष्ठा मिळणार आहे. अर्थात् त्या तोलानं संसारांत वागणारी आपली पत्नी बाहेरच्या जगांतहि थोडीफार लुडबूड करणारी असावी आणि तसं तिनं मिरवावं, असं त्याला वाटणं साहजिक आहे. पण तेवढीच त्याची परवानगी. ती मर्यादा पत्नीनं ओळखली पाहिजे. फाजील आकांक्षा धरतां कामा नये व संसार तसाच टाकून मिरवतां कामा नये — "

मी आईच्या तोंडाकडे स्तिमित होऊन पाहत राहिलें. अलीकडच्या सांसारिक जीवनाचा तिनं असा कांही विचार केला असेल याची मला कल्पना नव्हती.

आई पुढं म्हणाली, "अमेरिकेंतल्या गोऱ्यासाहेबाला सुद्धा — आधी हवी असते मन रमविणारी पत्नी नी संसार सांभाळणारी गृहिणी. — हें सांभाळून तिनं खुशाल मिरवावं. आमच्याकडले पुरुष पुरुष आहेत. बाय-कोनं घरापलीकडे पाहूं नये म्हणणाऱ्यांची संख्या शेंकडा नव्याण्णव आहे. तुझ्या यजमानाची यांतच जमा. तूं ही गोष्ट दृष्टीआड करतां कामा नये."

आईच्या वरील बोलण्यांत तथ्य आहे ही गोष्ट मला मान्य असतांहि मी एकदम विचारलं, "मग मी एवढी शिकलें नी बरोबरीनं पगार मिळवतें हें चुकलंच म्हणायचं ? —"

आई किंचित हसली व म्हणाली, "थोडं- थोडं-- स्त्रीचं आर्थिक स्वातंत्र्य व बरोबरीचं नातं आमच्या इकडच्या पुरुषांच्या डोक्यांत अद्याप ठसायचं आहे.— त्याला बरोबरीची बायको हवी. पण ती घराची कक्ष सोडून जाणारी नको —"

"मग यांनी मला तसं स्पष्ट कां सांगू नये ? —" मी नवल दर्शवीत विचारलं.

" अं– ." आई म्हणाली, " तें नवऱ्यानं सांगायचं नसतं. बायकोनं स्वतःच्या सुखाकरितां व स्वास्थ्याकरिता ओळखायचं असतं. – कुमुद तूं ओचा पदर झाडून निघालीस तर तुझा नवरा तुला अडवूं शकणार नाही. पण त्याच्या कपाळाला आठी पडल्यावाचून राहणार नाही. या दृष्टीनं तूं आपल्या यजमानाच्या हृदयांत डोकावून पाहण्याचा प्रयत्न केला आहेस क —एकदा अनुभव घेऊन बघ. घरांत राहून त्याच्या भोवती भोवती आस नि त्याची कळी कशी खुलते पाहा नी तसं कांही न करतां सभेला जाऊन वक्तृत्व गाजवून ये नि त्याच्या मनाचा ठाव घे. – तुझ्या सभेंतील पराक्रमाचं त्याला कांही वाटणार नाही. – कारण, त्याचं सौख्य त्यांत नसतं—

" म्हणजे आम्ही स्त्रिया केवळ पुरुषांच्या सुखाकरितां निर्माण केलेलीं खेळणीं आहों असंच कीं नाही ? " मी उद्वेगानं विचारलं.

आई कुचेष्टेनं हसली नी म्हणाली, " या आडमुठ्या प्रश्नाचं उत्तरहि तूं आपल्या मनांत शोध. मला तें नीट सांगतां येणार नाही. अन् मी सांगितलं तर तुला तें पटणार नाही. —बोलणं भलतीकडे जायला नको म्हणून सांगतें. गेल्या चार दिवसांत तुझी संसार करण्याची रीत पाहिली, ती मुळीच चांगली दिसली नाही, हें मला पुन्हां हडसून खडसून सांगायचं आहे. तुझ्या बोलण्यांत व घरांतील वागण्यांत गोडपणा नाही. मर्यादाहि नाही. उलट,एक तऱ्हेची बेपर्वा आढळली!— कशाचा ताठा आला आहे तुला एवढा ? आज पहाटेचा प्रकार ध्यानीं आण. सडोतीन हाताची धड धाकड अशी तरुण मुलगी तूं घरांत असतां तुझ्या नवऱ्याला नी दिराला घरांतलि आवराआवर करावी लागली, तुझ्या ॲट होमची ऐट त्यांना निस्तरण्याची पाळी आली, हें चांगलंच झालं नाही का?–अं–हं मला विचारूं नकोस. स्वतःच्या मनाला विचार—"

" आरोप लादायचा म्हटल्यानंतर मी तुझ्या पुढं काय बोलणार ?" मी रुष्टतेनं म्हटलं, " पण मी तें सारं करणार होतें— "

" श्यामाच्या जिवावर ना ? — अन् आईहि आली होतीच —" आई निःस्पृहतेनं म्हणाली, " तुला स्पष्टच सांगतें कुमुद, तुला किती टाकून बोलावं असं मला झालं आहे. मूर्ख पोरी, तुझ्या जिवावर तुझी जाऊ संसार टाकून दोन दिवस माहेरीं गेली काय नी तेवढ्या वेळांत स्वतःची खरी जबाबदारी न ओळखतां तू सार्वजनिक कार्यांत पडण्याचं सोंग केलंस काय ! — खरं खरं सांग, तूं आंखलेल्या कागदी योजना तुला निभण्यासारख्या आहेत ? — समाजकार्य करणं — प्रारंभ करून तडीला नेणं इतकं का सोपं आहे ? — सोंग करायचं म्हटलं तरी गांठीला पैसा पाहिजे. तुझ्याजवळ तसं काय आहे ? — आज कांही बुजगावणं उभं केलंस समजा; सुट्टी संपल्यावर काय करणार ? — मग तुझ्या या चार दिवसाच्या नाचरेपणाला तमाशा म्हणायचं नाही तर काय म्हणायचं ? — तुला आपल्या या वर्तनाची लाजच वाटली पाहिजे."

मान खालीं घातल्यावाचून मला गत्यंतर नव्हतं. आईचं म्हणणं शब्दशः खरं होतं.

आई रागाच्या स्वरांत पुढं म्हणाली, " मूर्ख पोरी, तूं बरोबरीची झाली आहेस. तुला बोलायचं तरी काय ? — पण संसारांतलि तुझी ही टाळाटाळ पाहून मला भारी दुःख झालं. — तुझ्या या वर्तनाचं मूळ कशांत आहे सांगूं ? — मी मिळवती आहें नी माझ्या जिवावर जाऊबाईचा संसार चाललाय् अशी तुला घमेंड आहे. अर्थात् घरांतल्या कामाचा राडा श्यामानं ओढला पाहिजे असं तुला वाटतं — "

" तसं नाही ग आई — " मी काकुळतीनं म्हटलं, " माझ्या तोंडांतून तसा शब्द गेला असेल तर शपथ."

" शपथ ! — कसली शपथ घेतेस ? " आईनं एकदम म्हटलं, " तुझ्या बोलण्याचालण्यांत तें स्पष्ट दिसतं नी तुझ्या मैत्रीणी पण तेंच बोलतात ! "

मी नवलानं तिचंच वाक्य पुन्हां बोललें: "मैत्रिणी पण तेंच बोलतात!" — आई ठासून म्हणाली, "हो. तुझ्या मैत्रिणी. तुझ्याकडे यथास्थित खाद खाऊन तोंडावर स्तुति नी पाठीमागं निंदा करणाऱ्या तुझ्या सख्याच तुझ्या दावेदार आहेत! — गेल्या पंधरा दिवसांत तुमच्या घरीं काय काय भानगडी झाल्या याची मला कल्पना नाही. पण तूं आपल्या जावेशीं सरळ वागली नाहींस एवढं मला कळलं आहे. तूं बाणेदार आहेस, तुझ्यांत धडाडी आहे नी तूं स्पष्टवक्ती आहेस अशी तुझी प्रशंसा तुझ्या मैत्रिणींनी माझ्याजवळ केली. पण हे सारे गुण तूं आपल्या जावेला दाखविलेस हेंहि त्या टवळ्यांनी सांगितलं! — आणि जेव्हां तूं प्रौढी गायलीस — माझ्या जाऊबाई माझ्या शद्बाबाहेर जात नाहीत — त्याच वेळीं मी ओळखलं: तूं पायरी सोडून वागत असली पाहिजेस — "

मी थिजलं. भयभीत झालें. एकूण माझ्या कागाळ्या माझ्या आईपर्यंत गेल्या! — आणि हा उपकार केला कोणी? — माझ्याभोवती जमून माझी आरती करणाऱ्या मैत्रिणींनी!

मी कांहीं बोलत नाहीं असं पाहून आई पुढं म्हणाली, "पण एक ध्यानांत ठेव कुमुद. तुझी जाऊ जशी सरळ आहे, तशीच मानी आहे. तुझ्या वर्तनानं तुझ्या जावेचा जर अपमान झाला असेल किंवा तिच्या जिवाला जर यातना झाल्या असतील तर ती तुझा ताठा चालूं देणार नाही. एखाद्या ओंगळ किड्याप्रमाणं ती तुला झाडून टाकील अन् पुन्हा तुझं तोंडहि पाहणार नाही.— तुम्ही दोघी जावा दूर दूर होण्यांत खरं नुकसान तुझं आहे, ताईचं नव्हे. तूं याचा विचार शांतपणें केला पाहिजेस. — तूं पुष्कळ हुशार असलीस तरी तुझी टी. डी. ची परीक्षा पास होण्याचं मोठं श्रेय ताईच्याकडे जातं हें तुला कृतज्ञतापूर्वक मान्य केलं पाहिजे."

"ते उपकार मी विसरलें अशी तुझी समजूत आहे? — " मी कांहीतरी बोललें. पण माझं मलाच वाटलं, त्यांत फारसं तथ्य नाही. इतक्यांत आईच

पुढं म्हणाली, " तुझ्या जावेचं तुझ्यावर केवढं प्रेम आहे?— याची तुला कांही कल्पना आहे का? – माझ्यासमोर घडलेला तो प्रसंग मला आजहि स्पष्ट आठवतो. मला वाटतं, गेल्या वर्षांतली गोष्ट, तुझा टी. डी चा अभ्यास चालू होता. एके दिवशीं क्लासला जाण्याची घाई झाल्यामुळं तूं न खातां पितां गेलीस. आठवतो तो दिवस? — तूं आज उपाशी शाळेला गेलसि, ही गोष्ट ताईच्या मनाला किती लागली? — मधल्या सुट्टींत तूं येईपर्यंत ताई त्या वेळीं जेवायच्या थांबल्या! — आज पोरटी जेवून नाही गेली, असे चुटपुटते उद्‌गार त्यांनी कितीदा काढले! – आणि त्या तुझ्याकरितां उपाशी ताठकळ्या! — त्यांनी तुझ्याकरितां वापरलेला पोरटी शब्द आजहि मला आठवतो! — किती मायेचा शब्द होता तो —"

" पण जाऊबाईचं तें प्रेम दृष्टीआड केलं नाहीं मी! — " मी दुबळेपणानं म्हटलं, " मी त्याबद्दल त्यांची केव्हांहि कृतज्ञ आहें."

" असं? — तरीच अप्पाची सेवा तूं इतक्या मनोभावें करतेस वाटतं? — " आईनं वक्रोक्तीनं म्हटलं, " त्यांच्या तिसऱ्या प्रहरच्या चहाची व्यवस्था तूं अति आस्थेनं करतेस आणि पहाटे उठूनहि त्यांची मर्जी सांभाळतेस — खरंच बाई. हें नाही बाई माझ्या लक्षांत आलं."

मला बोलायला तोंडच नव्हतं. तरी मी नम्रतेनं म्हटलं, " आई, आतां तुझं हें लावून बोलणं पुरें कर. — माझ्याकडून कांही गोष्टी चुकल्या आहेत, हें मी मुकाट्यानं मान्य करतें. पण मी जाऊबाईशीं कृतघ्नपणानं वागलें किंवा वागतें, हें मात्र खरं नाही."

" समजेल — समजेल." आई अविश्वास दाखवीत म्हणाली, " तेंहि मला समजेल. — आज जें समजलं, प्रत्यक्ष पाहिलं नी कानांनी ऐकलं तें तितकं बरं नाही. — तुझ्या या साऱ्याच वागण्याची मला खंत वाटते. आणि म्हणून मी आता इथं राहूं इच्छित नाहीं."

मी विरक्तीनं म्हटलं, " मर्जी तुझी! "

आणि आईनं एक निराळाच प्रश्न केला. "काय ग कुमुद, पहाटे श्यामानं एक पद म्हटलं नाही का? —कोणतं बरं? — कित्ती छान आहे तें!"

आईनं अगदी निराळं बोलणं काढलेलं पाहून मी भयचकित झालें. श्यामाच्या पदाची ही काय भानगड? — मला पद आठवलं. पण त्यांतून आणखी कोणतं किटाळ निघणार, काय सांगावं? मी स्तब्धच राहिलें.

तों आईच एकदम म्हणाली, "हं. आठवलं ग आठवलं. आम्ही काय कुणाचे खातों, तो राम आम्हांला देतो — हेंच ना ग. हो, हेंच. किती लक्षांत घेण्यासारखं आहे, नाही का? — पण काय ग कुमुद, श्यामानं हें पद मुद्दाम म्हटलं असावं का? — कीं तिला सहज आठवलं तें तिनं म्हटलं?"

आईचा हा कांहीतरी नवीन टोमणा आहे, हें मला स्पष्टच दिसलं. पण तो कोणता? — मी गोंधळलेल्या दृष्टीनं आईच्या तोंडाकडे पाहत राहिलें. तेव्हां आईच पुढं म्हणाली, "मला वाटतं, तिनं हें सहजच म्हटलं असावं. लहान पोर ती. तिला काय कळणार! — हें पद किनी समर्थ रामदास स्वामींचं आहे म्हणतात. श्रीसमर्थांचा संसार आपण चालवितों, असा म्हणे एकदा शिवाजी महाराजांना गर्व झाला — झालं. स्वामींनी त्यांचं हार्दिं ओळखलं नीं चक्क सांगून टाकलं कीं, आमचा अन्नदाता राम आहे! —"

मी पाहतच राहिलें. आईच्या बोलण्याचा रोख मला कळला. मी कांही बोलणार तों आईच पुढं म्हणाली, "कुमुद, समर्थांचा हा उपदेश आपण सर्वांनीच ध्यानांत घेतला पाहिजे, नाही का? — माझ्या पगारामुळं किंवा पतीच्या प्राप्तीमुळं आपला संसार चालतो, असं पाप जर का तुझ्या मनांत आलं असेल तर — श्यामनं दिलेला हा उतारा लक्षांत घे. — उगीच ताठूं नकोस. ताईचे तुझ्यावर झालेले उपकार विसरूं नकोस. —

तसं जर करशील तर देव तुझ्याकडे कसा पाहील हें मला सांगतां येत नाही. पण आई या नात्यानं मला मात्र "अशी कृतघ्न कारटी आपल्या पोटीं आली अं!" अशी खंत सारखी वाटत राहील. पाहा बाई तुझं तूं —"

आईचं बोलणं अगदी खरं असलं व मी अपराधी असलें, तरी माझ्या सहनशक्तीला कांही सीमा होती! — मला आईच्या बोलण्याचा उबग आला. मी तिच्यापुढून उठून दुसरीकडे निघून गेलें. मी जात असतां आईचे शब्द ऐकले: उद्यां सकाळीं मी जाण्याचं ठरवलं आहे अं—"

तिच्याकडे न पाहतांच मी मान डोलावून "बरं—" असा शब्द उच्चारला.

दुसरा दिवस उजाडला. आईचा बेत फिरेल अशी मला आशा होती. पण ती विफल झाली! माझ्या विनवणीला किंवा पुरुषांच्या आग्रहाला न जुमानतां आईनं प्रस्थान ठेवलं. मी मनाशीं म्हटलं "तथास्तु!"

— १३ —

## घरच्या वकिलाचं साह्य

आई कांहीशी रागानं एकाएकी आली तशी निघून गेली या गोष्टीचं मला मनापासून वाईट वाटलं. थोडा रागहि आला तिचा. परिस्थितीमुळं म्हणा, किंवा माझ्या स्वभावदोषामुळं म्हणा, आजकाल मला थोडा एकलेपणा येत चालला होता. त्यांत आईनं येऊन मला यथास्थित झाडली. मी जर्जर झालें. पण तिचं बोलणं, तिनं केलेले आरोप आणि तिनं सुचविलेल्या गोष्टी मला विचारार्ह वाटल्या. विशेषेंकरून 'सार्वजनिक कार्यांत तूं एवढी दांडगी उडी घेऊं नको' हें तिचं सांगणं मला तात्काळ पटलं. आपण भलत्या भानगडींत पडल्याचं मला भयहि वाटूं लागलं.

एक गोष्ट मला मान्य केली पाहिजे. माझ्या तरुण जीवनांत त्रासदायक असा उणेपणा कसलाच नव्हता. दाम्पत्यप्रेमांतहि मी भाग्यवान् होतें. जाऊबाई नसल्यामुळं संसार सांभाळण्याची जबाबदारी माझ्यावर होती, यांत शंका नाही. आईच्या दृष्टीनं मी तिकडे दुर्लक्ष केल्याचं सिद्ध होत असलं तरी यजमान किंवा दीर यांची मर्जी गेल्याचं कांही दिसलं नाही. एकंदर गाडं सुरळीत चालल्याचा अनुभव आला. मात्र पतिप्रेम व संसार यांच्याविषयीं मी जास्त दक्ष असलं पाहिजे ही आईची शिकवण मला पटली. मैत्रीणींना कोणत्या तोलानं जोखायचं आणि त्यांना जोडायचं-तोलायचं किती, याचा विचार करणं मला भाग होतं.

पण या सर्वांत महत्त्वाचा प्रश्न होता : जाऊबाईंच्या संबंधांत घडलेली विघटना पुन्हा सांधून कशी घ्यायची व आपण उभं केलेलं सार्वजनिक कामाचं सोंग आवरतं कसं घ्यायचं ?

या संबंधीं विचार करितां पुन्हां असं वाटलं : जाऊबाईंशीं मी कृतघ्न झालें हा आईचा आरोप तितकासा खरा नाही. त्यांना मानसिक त्रास होईल असें कांहीं घडलं आहे, हें कबूल. पण त्याचा बाऊ मी मानूं किती ? — मी 'क्षमस्व' म्हटलं कीं, जाऊबाईंनी 'बरं' म्हणायचं. दोघींनी मागचं विसरून जायचं. काय कठीण आहे यांत ?

आई गेल्यानंतर माझं जे मानसिक आंदोलन झालं त्याचं चित्र हें असं होतं. मात्र माझी मनःस्थिति एखाद्या अनाथ, पंगू व रुग्ण माणसा-प्रमाणं झाली होती. कोणीतरी माझ्या पाठीवरून हात फिरवून मला धीर देण्याचं काम करायला हवं होतं.

एका तिसरा प्रहरीं मी अशीच सचिंत होऊन आपल्या माडींत बसलें होतें. हे चहा घेऊन कुठं बाहेर गेले होते. दोन दिवसांत महिला मंडळाची सभा घेऊन कांही ठरवावयाचं होतं. इतर कामं ताठकळत होतीं. त्या सर्व जंजाळांतून सुटका व्हावी व कामं अर्धवट टाकल्याचं अपेश तर येऊं नये असा पेंच होता. विचार करतां करतां मी रडकुंडीला येऊन आपल्याच तंद्रींत मग्न झालें. तोंच हे बाहेरून व माडी चढून केव्हां आले, माझ्या ध्यानीं आलं नाही.

"हं !" यांचा उद्गार ऐकला. मी चपापून यांच्याकडे पाहिलं. दृष्टा-दृष्ट होतांच ते जवळ येऊन म्हणाले, "आर्ये ! — दुःख किमर्थ ? — मातृविरह म्हणून कीं जगाचं कसं होईल म्हणून ?"

मी आठ्या घालून विचारलं, "काय हो, तुमच्या कोशांत गांभीर्य हा शब्द नाहीच का ? — सदा न् कदा तुम्हांला थट्टा सुचते तरी कशी ?"

हे हसले व हात उडवीत म्हणाले, " उत्तर अगदी सोपं आहे. मन आनंदी असलं की विनोद सुचतो. विनोद सुचला की थट्टा करावीशी वाटते."

" शहाणे आहांत " — मी तुटकपणा दाखवीत म्हटलं, " दुसऱ्याचा प्राण जात असला तरी तुम्ही म्हणणार, डोळ्यांचा अभिनय काय सुंदर आहे. चला, बोलूं नका माझ्याशीं."

मान खालींवर हलवीत हे म्हणाले, " अस्सं! प्रसंग बाका आहे, गंभीर विचार करण्याचा आहे व दुःखमग्न होण्याचा आहे, असं तुझं म्हणणं! — म्हणजे मला Serious झालं पाहिजे असंच कीं नाही? — सोपी गोष्ट! — पाहा. चेहरा लांबट व आंबट करून मी Serious होत आहे. ( जवळ बसून रडक्या सुरांत ) — बोल, लाडके, बोल ग! — तूं अशी दुःखी कां? तुझा हा चिंतामग्न चेहरा पाहून माझ्या हृदयांत अशी कालवाकालव होत आहे — " ( गळ्यांत पडण्याचा आविर्भाव )

मी त्यांना दटावीत खुदकन् हसलें. त्यांचं काम झालं. " तुम्ही किनी अगदी — हे आहां." मी ओठावरून जीभ फिरवीत म्हटलं, " तुमची बायको कोणत्या संकटांत आहे याची तुम्हांला कल्पना आहे? — "

" कांहीच नाही. मात्र तिचं संकट कांहीं तरी फुसकं आहे, असा माझा विश्वास आहे." ते म्हणाले. मी ठसक्यानं उठून जाऊं लागतांच त्यांनी मला धरून ठेवली नी म्हटलं, " जाऊं दे आपण गंभीरपणानं विचार करूं. — बोल, काय भानगड आहे?"

जाऊबाईसंबंधींचा भाग वगळून आई कां लागलीच निघून गेली, याची सर्व हकीगत मी यांना सांगून टाकली!

" बस? — " यांनी उद्गार काढला व ते एकदा मनापासून हसले. मी पाहतच राहिलें. आपलं हसं आवरीत ते म्हणाले, " अरे हो.

आपल्याला seriously विचार करायचा आहे नाही का? excuse अं. dear! -- अं. — हं अशी फुटाण्यासारखी उडण्याचा प्रयत्न करूं नकोस. तुझ्या आईनं तुझी जी झाडंपट्टी केली आहे, ती वावगी नाही. मासिकांतील तो उतारा मीच रेखांकित करून ठेवला होता. घरांत कुमुद रायकर माझी अर्धांगी म्हणून असली पाहिजे यांत शंका नाही. मात्र तुझ्या एकूण वर्तनाबद्दल आपल्याला कधी राग आला नाही अं. — अन् (हृदयावर हात ठेवून) इथली गोष्ट सांगायची म्हणजे — तूं मला मनापासून आवडतेस. तुझ्या बुद्धिचापल्याचं मला कौतुकहि वाटतं! — आपलं तें वधु-वर-संमेलन-तें तुझं हास्य! — मला अगदी बावळट करून सोडलंस त्या दिवशीं! — मग वहिनींनी मला त्या तुझ्या हसण्याचं कारण सांगितलं — छे छे छे असा हसलों मी! — आजहि साक्रीकर बाईकडे पाहिलं कीं मला आंतून गुदगुल्या होतात! — "

"अहो व्याख्याते —" मी त्यांना कोपरखळी देत म्हटलं, "मुद्दा राहिला बाजूला. सार्वजनिक कामाच्या पकडींतून सुटून पसार कसं व्हायचं? — उजळ माथ्यानं, त्याची तोड सांगा — "

"Thank you" त्यांनी मान लववीत म्हटलं व पुन्हा ते भरपूर हसले. नंतर ते म्हणाले, "तूंसुद्धा अगदीच हीं — म्हणजे बावळट आहेस बरं का! --अग तुला पडलेला पेंच म्हणजे काय, यूनोचं राजकारण आहे! — इतक्या इतक्या पळवाटा आहेत! शिवाय एका नामांकित वकिलापुढं तूं आपली केस मांडली आहेस. अपेश येण्याचं कारण नाही.-- खरं म्हणजे तुझी तुला युक्ति कां सुचूं नये याचं मला नवल वाटतं — "

"प्रत्येक अशिलाला जर स्वतःचा कज्जा स्वतःच्या शहाणपणानं जिंकण्याची खात्री असती तर कुमुदच्या यजमानांना कायद्याच्या अभ्यासाचा आटापिटा करण्याचं कारण राहतं ना -- मी म्हटलं, "वकिलानं आलेल्या अशिलाला तुला मार्ग कां सुचत नाही? म्हणायचं नसतं. तर त्याल

युक्त्या सुचवायच्या असतात — ”

“ बराबर! — बराबर!! — ” हे म्हणाले, “ पण ज्या अशीला-कडून पैसा मिळण्याची आशा नसते — ”

“ असं? — ” मी ओठ दाबून हसत म्हटलं, “ मग मघाशीं प्रोसेस फी दुपटीतिपटीनं वसूल केलीत त्याची काय वाट? — फाजीलपणा पुरे. युक्ति — युक्ति सांगा — ”

ते बोटं नाचवीत म्हणाले, “ युक्त्या या पाहा तयार आहेत. — मात्र आधी बजावतोः त्यांचं महत्त्व नाकारून वकिलाची फी बुडवायची नाही! ”

मी आंगठा व तर्जनी जुळवून हात हलवला.

ते हसले व म्हणाले, “ युक्ति नंबर वन्! पोलिटिकल आजार निर्माण करणें! — म्हणजे कांही तरी बड्या रोगाचं आक्रमण होत आहे असं भासवून मुंबईला पळणें. — आजार एकदम न कळणारा पण भय उत्पन्न करणारा असावा! उदाहरणार्थ — ॲपींडीसायटीस. अल्सर ऑफ दि स्टमक. डिसप्लेसमेंट ऑफ दि युटेरस् — इत्यादि — हीं नांवं ऐकलीं कीं, कच्च्या दिलाचा डॉक्टरसुद्धा घाबरतो! — यापेक्षां रोगाचं नांव अवघड नी भयप्रद पाहिजे असल्यास इंग्रजी अक्षरांची कसलीहि जुळणी करावी न् तोंडं वेडींवाकडीं करीत उच्चार साधावा — ”

मी मान हलवीत नकार दर्शवीत म्हटलं, “ स्वतःच्या प्रकृतीला भलता अपाय करून घ्यायला अशीलाची तयारी नाही, वकीलसाहेब. यापेक्षा सोपी युक्ति हवी — ”

“ कांही हरकत नाही — ” वकीलसाहेब बेफिकीरी दाखवीत म्हणाले, “ सत्य नी अहिंसा या दोन ठोकळ्यांचा उपयोग करावा नी लोकांना गाढव ठरवावं! — ”

“ नाचायला येईना, आंगण वाकडं — ” मी हसं दाबित म्हटलं,

" असा आरोप आला तर — "

" वा ! — त्याचाच उपयोग करून घ्यायचा — " वकील म्हणाले, " लोकांना हडसून खडसून सांगायचं — बाप हो, तुमचं आंगण सरळ आहे, हीच मोठी गैरसोय. — मी खेकडा पद्धतीचा नाच दाखविणार. त्याला सरळ आंगण काय कामाचं ! — तेव्हां आधी वाकड्या आंगणाची व्यवस्था करा पाहूं — " ते ऐटीनं पुढं म्हणाले, " सरळ आंगण वाकडं करणं ही काय सोपी गोष्ट आहे ? — लोक घाबरतात, स्तंभित होतात. तोंपर्यंत आपला भगतगण इन्किलाब झिंदाबाद करतो ! — आपली सुटका होतें. "

" वाहवा ! — " मी मनापासून हसत म्हणालें, " पण काय हो वकीलसाहेब, लोक पेटले हट्टाला नी त्यांनी हवं तसं वाकडं आंगण दिलं नाचायला, तर ? — "

ते न अडतां म्हणाले, " आणखी सोपं काम. " सत्य नी अहिंसा यांची गल्लत करायची ! इतकी कीं, स्वतःचं बोलणं स्वतःला कळेनासं व्हावं ! — आणि ऐन धांदलींत सांगून टाकावं, माझा वाकडा — खेकडा — नाच समजून घेण्याची तुमची पात्रता नाही. म्हणून मला कांही करतां येत नाहीं — "

" आणि यांतून लोक हट्टाला पेटले तर — "

" शेषं कोपेन पूरयेत् ! " वकील म्हणाले, " लोकसेवेंतून निवृत्त होण्याची धमकी द्यावी नी चालूं लागावं — "

मी घाबरल्याचं सोंग करीत म्हटलं, " छे बाई, ही युक्ति थोरा मोठ्या साधू-संताला साधेल. माझ्यासारख्या पामराला साधणं कठीण ! — "

वकील न डगमगतां म्हणाले, " युक्ति नंबर तीन. तुला मुंबईला आपल्या मावशीकडे जायचं आहे. तिथं कोणाला तरी आजारी पाडायचं.— तार आल्याचं सांगायचं ! लोककार्याचा विणा तात्पुरता कुणाच्या तरी

गळ्यांत आडकावयचा. चालूं लागायचं — ”

मी विचार केल्याचा बहाणा केला नंतर म्हटलं, “ असं कोणाला बाई आजारी पाडूं ? ”

“ डिप्लोमशी — कुमुदबाई — अंगांत डिप्लोमशी पाहिजे. कोणत्या चित्रपटांत या डिप्लोमशीची गंमत आलीय बरं — ( आठवत ) जाऊं दे. हे पाहा. मुंबईला तुझी मावशी आहे. त्या मावशीला एखादा मामेसासरा असणं शक्य आहे की नाही ? -— आहे. त्या मामेसासऱ्याचा एखादा मावस मेव्हणा ? ”

“ आहे -— पुढं -— ”

“ केस घोटाळ्याची करायची असल्यास यांत वाटले तितक्या नात्यांची भर घालावी आणि यापैकीं कोणी तरी एक ममईच्या K. E. M. हॉस्पिटलांत अत्यवस्थ असल्याचं सांगावं नीं इथून तात्काळ पसार व्हावं ! — ” वकील आळस देत म्हणाले, “ बास. आता यापुढं एकही युक्ति सांगणार नाहीं. आता सांगितलेली सोप्यांत सोपी आहे. -— जाऊबाईंना या म्हणून तातडिचं पत्र टाकावं — ”

“ त्यांच्यावर वरील युक्तीचा प्रयोग करायचा कीं काय ? ” मी सभयता दर्शवीत विचारलं.

“ अं — हं ! ” वकील म्हणाले, “ खाजगी व्यवहारांत बाहेरचं राजकारण आणायचं कशाला ? ”

“ खरं आहे. ” मी पुढं म्हटलं, “ मग तुम्ही येतां माझ्याबरोबर जिवाची मुंबई करायला ? ”

“ नाही — ” हे म्हणाले, “ आमचं एक टोळकं महाबळेश्वराला जाणार आहे. सारे पुरुष पुरुष ! — तेव्हां मी तुझ्याबरोबर येऊं शकत नाहीं आणि माझ्याबरोबर तूं येणं शक्य नाहीं. या सुट्टींत दोघांचा सवता सुभा आहे — ”

दोघेहि मनापासून हसलों. माझ्या मनाला खरंच बरं वाटलं. जिवाच्या सखा तारक ठरला. मी त्याच दिवशीं जाऊबाईंना व मावशीला पत्रं लिहिलीं.

जाऊबाई येतांच मी मुंबईला निघून जाण्याचं ठरवलं. मनाचीं इतर जळमटं नाहीशीं झाली. मग मी आईलाहि एक सामोपचाराचं पत्र लिहून तिचा उपदेश मान्य असल्याचं कळवलं.

दोनच दिवसांनी जाऊबाई आल्या. दर्शनीं मला त्या मोठ्या आनंदी दिसल्या. तेंहि त्यांचं कांही ठरविलेलं सोंग होतं कां? — कारण, अल्पावधींत एक गोष्ट माझ्या ध्यानीं आली. इतरांच्याशीं बोलतांना माझा उच्चार धाकट्या जाऊबाई असा करणं नी माझ्याशीं बोलतांना आदराची — आर्जवाची भाषा. अहो जाहोचं संबोधन!

ही त्यांची सावधगिरी मला रुचेना आणि चालू कृत्रिमता नाकारतां येईना. बरं, यांत अंतस्थ राग वा तुच्छता वा उपालंभ होता का? — मुळीच नाही. अगदी भरपूर मनमोकळेपणा आणि बोलणं चालणं. आई चार दिवस राहिल्या कां नाहीत? — तुम्ही आतां मुंबईला जायला हरकत नाही. इत्यादि गोष्टी त्या पुनः पुन्हा बोलल्या.

या त्यांच्या विशेष वर्तनामुळं माझ्या मनाला चटका लागला व या मानी बाईला forget and forgive हें तत्त्व कसं पटवून द्यावं, हें माझ्या ध्यानीं येईना.

शेवटीं, मुंबईला गेल्यावर जाऊबाईंना एक छान पत्र पाठवावयाचं, त्यांची क्षमा मागायची नी त्यांचा राग दूर करायचा असं मनाशीं ठरवून मी मुंबईला गेलें.

— १४ —

## पांच कुटुंबांचं संस्थान

त्रस्त मनाला थोडी शांती व समतोलपणा येण्यास स्थलांतर हा एक चांगला उपाय आहे, यांत शंका नाही. मी मुंबईकडे धावण्याची घाई त्याकरितां केली. बरोबर श्यामाला घ्यावी असा एक विचार मनांत आला होता. पण जाऊबाईंची इच्छा दिसली नाही. ‘ थोडा स्वतंत्रपणा असूं दे.” असं बाईंनी सांगितलं. मलाहि तें पटलं. प्रथम एकटीच निघालें. पण स्टेशनवर येतांच परिचयांतील अशा दोन तरुण मुली व त्यांची चिमणीं बाळं, एक तरुण मुलगा असा संच मुंबईपर्यंत जाणारा आढळला. एकट्यानं कंटाळवाणा प्रवास करण्याची अडचण दूर झाली.

गाडीला गर्दी खेचाखेच नव्हती. आम्ही बायकांचा डबा पसंत केला होता. बरोबरीचा मुलगा जवळच्या डब्यांत चढला. प्रवासाचा प्रारंभ जिकिरीचा वाटला नाही. पण स्त्रीजगताचा तो थर्ड क्लासचा डबा. मनुष्य-स्वभावाचं व भाषा पोषाखादि बाह्य देखाव्याचं केवढं वैचित्र्य तिथं एकत्र झालं होतं ! — माझ्या बरोबरीच्या मुली दोन भिन्न कुटुंबांतील. दोघींच्या जीवनाच्या दोन तऱ्हा होत्या. एकीच्या घरांत भावाभावांचीं भांडणं सुरू होती व वेगळं कसं व्हायचं, हा प्रश्न त्रासदायक झाला होता. संकट हें : म्हाताऱ्या आईला सांभाळायची कोणी ?

दुसरीला संसारच नव्हता. पतिराज वर्ष झालं, कुठं कलकत्त्याकडे

निघून गेले होते. सासऱ्यानं मुलाचं नांव टाकलं होतं. म्हणून ती मुलगी एक प्रकारें अनाथ होऊन भावाकडे राहण्यास चालली होती. पण त्या बिचारीला भावजय कशी वागेल याची काळजी पडली होती.

पलीकडच्या बाकावर एक आरवाड–सासू व तिची सून आणि दोन खोडकर कारटीं असं कुटुंब होतं. गंमत ही की, कोणी कोणाच्या कह्यांत नव्हतं व सर्व दुसऱ्याला सावरून होती. यांच्या पलीकडे एक कष्टाळू दिसणारी प्रौढ वयाची बाई होती. तिचं सुनेशीं न पटल्यामुळं ती घरा-बाहेर पडून स्वकष्टानं पोट भरण्यास मुंबईला निघाली होती !

जास्त सांगत नाहीं. जविनांतलि कठोरतेमुळं त्रस्त झालेलीं व पुढं काय या प्रश्नानं बावरलेलीं अशीं माणसं — केवळ बायाच — त्या डब्यांत प्रामुख्यानं होतीं. आपलीं दुःखं वा संकटं वेशीवर टांगण्यांत फायदा काय हें बहुशः सर्वांना कळत असावं. परंतु ममत्वाचा ओलावा न मिळाल्यामुळं शुष्क झालेलीं मनं तळमळण्यावाचून स्तब्ध कशी राहणार ? — मनांत तरी किती ठेवायचं ? किंवा सहन करायचं ? प्रत्येकीची जमि त्यामुळं सैल होत होती. एका व्यवहारचतुर बाईनं म्हटलं सुद्धा : घरोघरीं त्याच परी. न सांगेल तीच बरी ! — मी हें सारं जीवननाट्य पाहत होतें. स्वतःशीं चकित होत होतें. विचारहि करीत होतें. वर्तुळं अनेक उठत होतीं. पण सर्वांचं केंद्र एकच होतं. स्वतःचं जीवन. स्वतःचा संसार.

आमच्या कुटुंबांत वाईट वा कलहप्रिय कोण होतं? कोणीच नाही. दोन भाऊ, दोघांच्या बायका नी एका भावाची चार मुलं. कुटुंब मोठं नव्हे. मग विग्रहाचं बीज कां येऊन पडावं ?

दोन टोकं निश्चित झालीं : मी कसं वागलं पाहिजे हें एक; जाऊ-बाईंनी काय करायला हवं हें दुसरं.

आपण कांही तरी चुकलों, ही रुखरूख एका टोकाला. जाऊबाईंनी

पराचा कावळा का करावा, ही रागाची चुटपूट दुसऱ्या बाजूला. या-करितां तडजोड हवी, नाही का? पण प्रथम कोणी करायची?

पुणं सुटलं. नवी गाडी. नवा डबा. नवीं माणसं. नवा प्रदेश. गाडी सपाट्यानं चालली होती! — भय उत्पन्न करणारी चपला तिला खेचून नेत होती! मानवकृत गाडीला व निसर्गदत्त विद्युत्‌ला मानवरूपानं नटलेलं जग ओढून नेतांना कांही भान असेल का? — किती आशा निराशा किती सुखं दुःखं, किती ममत्व शत्रुत्व एका स्थानाहून दुसरीकडे चाललं होतं! — गाडीतलं एवढ्याशा जागेंत सामावलेलं जग पाहण्यासारखं होतं कीं, बाहेरच्या बाजूला मागं मागं धावणारं सृष्टीचं रूप पाहण्यासारखं होतं?

मुंबईच्या पंचक्रोशींत गाडी आली. मी दादरला उतरलें. माझा मावस-भाऊ वसंतदादा व त्याची बायको वीणा मला उतरून घेण्यास आली होती.

माझी मावशी आईपेक्षा दोन वर्षांनी वडील. आतां विधवा. पण संसार चांगला झाला होता. दोन मुली, एकच मुलगा. दहावर्षांपूर्वीच मावसे वारले होते. पण त्यांनी बायकोची व मुलाची व्यवस्था चांगली करून ठेविली होती. नवऱ्याच्या पश्चात्‌ मावशीनं सर्व कांही ठीक सांभाळलं होतं. दोन्ही मुलींचीं लग्नं झालीं होतीं. एक बडोद्यास दिली होती. दुसरी मुंबईच्या आसमन्तांत होती. वसंतदादाचं लग्न आठ वर्षांपूर्वीच झालं होतं. त्याला मुलं दोन. एक सहा वर्षांची मुलगी मालू. चार वर्षांचा मुलगा रवींद्र. वीणावहिनी माहेरहून डबोलं घेऊन आल्यामुळं व पुढंहि आणखी मिळणार असल्यामुळं ती नवऱ्याची लाडकी होती. थोडी कुरेंबाज होती. सासूसुनेचं वितुष्ट नव्हतं पण मोठं सख्यहि नव्हतं. वसंतदादा फक्कडराव होते. आईजवळ कांही माया आहे हें ते जाणून होते. मातृभक्तीचा ओलावा राखणं त्यांना भाग होतं.

माझं स्वागत सर्वांनी केलं. पहिले दोन दिवस मोठ्या आनंदांत गेले. सुशीलाताई — मावसबहीण — जवळच कुर्ल्याला राहत होती. तिला निरोप गेला होता. जोगदेव नांवाचं कुल तिनं सजवलं होतं. तिचा संसार चांगला चालल्याचं मावशीच्या बोलण्यांत आलं.

तिसऱ्या दिवसाची गोष्ट. वसंतदादा व वीणावहिनी छोट्या रवींद्रासह विरारला निघून गेल्या. तिथं त्यांचं माहेर होतं. मला हा प्रकार थोडा चमत्कारिक वाटला. आपलं येणं तितकं सुखावह झालेलं नाही का? — मला चुटपूट लागली. पण मावशीच्या बोलण्यावरून कळून आलं कीं, तसं कांही नाही. त्या जोडप्याचा तो बेत पूर्वीपासूनचा होता. मी येणार म्हणून तें जोडपं दोन दिवस थांबलं इतकंच.

दादा वहिनी गेल्यावर आम्ही तिघी राहिलों. मावशी, मी व मालू. लहान मुलांची तशी मोठी गंमत असते. मालू गोड मुलगी. आजीचं वळण चांगलं. तिचं माझं सूत जमलं. फक्त मी तिची आत्या कशी, नी तिची आजी माझी मावशी कशी, हे नातं तिला नवलांत पाडणारं होतं.

मुंबईचा उन्हाळा, अंगाला येणारा घाम, विजेच्या पंख्याचा तोच तो आवाज आणि त्यापासून मिळणारा तो निर्जीव वारा — वर्णन करण्याचं कारण नाही. दादरचा समुद्र किनारा हें सांयकाळचं वैभव होतं. मावशीचं राहतं स्थान प्रशस्त — हवाशीर — होतं.

तिसरा प्रहराची चहाची वेळ. सुशीलाताई येणार होती. तिचीच वाट पाहत व तिच्या सासरच्या गोष्टी बोलत मी, मावशी बसलों होतों. मालू कांही खेळ काढून बसली होती.

मावशी हसत म्हणाली, "आमचे व्याही अबा जोगदेव मोठा लुक्का प्राणी आहे बरं का. त्यांचा संसार मोठा आहे. नवराबायको पांच मुलं, एक विधवा बहीण नी एक विधवा मुलगी, असा कबिला आहे. अबा पेनशनींत निघाले आहेत. आमचे जावई — सुशिलेचे यजमान — एकटेच

मिळविते. अबाचं पेनशन शंभराच्या आंतच. खाणारीं तोंडं दहा. पण अबांनी आपला जम असा बसवला आहे कीं कौतुक करावं माणसानं. — एखाद्या संस्थानिकासारखा थाट आहे."

"म्हणजे? केलंय् काय त्यांनी असं? — कांही कारखाना काढलाय् कीं दुकान चालवलंय् कीं खानावळ काढलीय्?" मी जिज्ञासेनं विचारलं.

"सगळं काही आहे —" मावशी म्हणाली, "त्यांनी कसा व्यूह रचलाय् सांगतां येणार नाही. — जाऊन पाहिलं पाहिजे. फारच मजा आहे. दुकान, खाणावळ, कारखाना, शाळा, दवाखाना सर्व कांही आहे. अबांचं स्वतःचं कुटुंब दहा अकरा माणसांचं. पण त्यांनी सांभाळ-लेलीं कुटुंबं आहेत पांच! — आणि एकूण माणसं आहेत पस्तीस चाळीस! म्हातारीं प्रौढ, तरुण नी मुलं असा मेळावा आहे."

"बाई! —" मी नवलानं म्हटलं, "आणि इतक्यांचा खर्च अबा चालवितात? — जोगदेव आडनांवाचीं पांच कुटुंबं एका वाडींत वसलीं आहेत कीं काय?"

"नाही. तसं बोलायचं म्हणजे गोलंकार आहे —" पांच कुटुंबं पांच जातीचीं आहेत. अबांचं कुटुंब काय तें कोकणस्थाचं. मग सारस्वत, कायस्थ प्रभु, वाणी, मराठा अशीं कुटुंबं आहेत. सर्वांचा सैंपाक एकत्र होतो. सर्व एकत्रच जेवतात, खातापितात. अबांनी ती मोठी गंमत घडवून आणिली आहे —"

"असं? —" मला आणखी आश्चर्य वाटलं. मी पुढं म्हटलं, "छे: मला जाऊन पाहिली पाहिजे ही कॉलनी."

"सुशिला तुला घेऊन जाईल —" मावशी म्हणाली, "चांगली दोन तीन दिवस राहून ये."

इतक्यांत मालू नाचत आली — "आत्या आली ऽऽ आली! बबन आलाय — आलाय्!"

ठरावाप्रमाणं सुशिलाताईचं आम्ही स्वागत केलं नी तिला शंभर वर्षांचं आयुष्य असल्याचं आशीर्वचन दिलं.

मुंबईला वेळ साधण्याचं व सांभाळण्याचं बंड फार दांडगं आहे व त्यामुळं आधीं तें ठरवावं लागतं. म्हणून मावशीनं चहा घेत असतांच लेकीला विचारलं, " काय ग लागलीच परतणार कीं राहणार दोन दिवस ? "

" उद्या दुपारीं गेलं पाहिजे —" सुशिलाताई बबनला दूध पाजीत म्हणाली, " या महिन्यांत आमच्या संस्थानांत एक विवाह नी दोन मुंजी अशीं तीन कार्यं आहेत. त्याच्यासंबंधी कांही ठरवायचं आहे. सासूबाईंनी लागलीच बोलावलंय् —"

" मग जातांना कुमूदला घेऊन जा पाहिजे तर तुमचं संस्थान दाखवायला." मावशीनं सुचवलं.

" अवश्य —" सुशिलाबाई माझ्याकडे पाहत हसत म्हणाली. " मी तिला नेण्याकरितांच आलेंय —"

मी सहज विचारलं, " विवाह व मुंजी आपल्या घरांतल्या आहेत कुणाच्या ? "

सुशिला हसली व म्हणाली, " घरांतल्या म्हणजे संस्थानांतल्या. आमचे एक शेजारी जाधव आहेत. त्यांची चंद्रा नांवाची मुलगी आहे. उपवर आहे. मामंजींनी तें सारं ठरवून टाकलंय्; त्याचप्रमाणं पणजीकर म्हणून आहेत. त्यांच्या मुलांच्या मुंजी आहेत —"

मला संस्थानाच्या या व्यवस्थेचा कांही उलगडा पडला नाही. माझं मनोगत ओळखून सुशिला म्हणाली, " प्रत्यक्ष पाहिलं म्हणजे पटेल. सहज उलगडा होईल."

मावशी व मालू कांही आल्या नाहीत. मीच माझ्या मावस बहिणीबरोबर दुसऱ्या दिवशीं कुर्ल्यास गेलें.

मुंबईच्या परिसरांत कुर्ला आहे. जुन्या कुर्ल्यांत गेल्यास आपण एखाद्या

भिकार खेड्यांत आल्याप्रमाणं वाटतं. फक्त बॉबे आग्रा रोड दिमाखांत चालला आहे. किती तरी शेतें व मोकळ्या जागा आहेत. तरीपण धावपळ जाणवते.

सुशिलाताईनं वर्णन केलेलं संस्थान म्हणजे जरा बाजूला एक नारळीच्या छायेंत झाकलेली वाडी होती. साधारण अर्ध्या एकराचं रान असावं. तीन साधीं बैठीं घरं नी बाकीची मोकळी जागा. पाण्याची सोय म्हणजे गडगंज पाण्याची विहीर. हवेच्या दृष्टीनं कुर्ला फार चांगलं आहे असा बोभाटा आहे. तो खरा किती, तेथील रहिवाश्यांना माहीत. मोकळेपणामुळं मला दादरपेक्षा तें स्थान सुंदर व शांत, थंड व निर्मळ वाटलं. अशा स्थानीं पांच जातींचीं पांच कुटुंब एकत्र आलीं व त्यांनी सर्वानुमतें आपलं हें अभिनव संस्थान स्थापन केलं. पांच वर्षं झालीं या गोष्टीला.

यासंबंधीं सुशीलेनं माहिती देतांना सांगितलं कीं, रेशनची पद्धत, वाढती महागाई, बेपर्वा समाजस्थिति आणि बकाल राहणी यामुळं कंटाळलेल्या एक दोन कुटुंबांना प्रथमतः ही कल्पना सुचली. दोन माणसांच्या सैंपाकांत तिसरं मनुष्य जर सहज जेवूं शकतं तर दोन कुटुंबांनी खानपान एकत्र आणिल्यास काटकसर होईल की नाही? — हिशेब बरोबर होता व वाटाघाट करतांना ही गोष्ट जमण्यासारखी आहे असंहि ठरत होतं. पण ही मोट बांधायची कोणी?

अशा अवस्थेंत अबा जोगदेव सेवानिवृत्त झाले. आणि त्यांना थोरल्या मुलाच्या ( सुशीलेच्या यजमानांच्या ) संसाराकरितां मुंबईच्या परिसरांत येणं आवश्यक झालं. तेव्हा ही कल्पना त्यांच्या कानीं गेली. त्या बरोबर त्यांनी ती उचलून धरली. तिच्यावर खूप विचार केला. एक आराखडा आंखला व आणखी एक कुटुंब एकत्र येण्यास तयार झाल्यास स्वतःचं सबंध कुटुंब मुंबईस आणण्याचं निश्चित केलं. शोध घेतां घेतां पणजीकर व जाधव असे दोन गृहस्थ सहकुटुंब येण्यास तयार झाले. एकूण तीन कुटुंबं एकत्र राहण्याचं ठरलं. कुर्ल्याला सध्याची जागा शंभर रुपये भाड्यांत ठर-

विली. आणि महिन्या दोन महिन्यांत संस्थान स्थापन झालं. लढाईच्या ऐन धुमश्चक्रींत युद्धयमान राष्ट्रांतील हजारो कुटुंबं उध्वस्त होत असतां दुर्दैवानं त्रस्त असलेल्या हिंदुस्थानांत - मुंबईच्या परिसरांत —तीन मधल्या वर्गांतील कुटुंबं सहकारी तत्त्वाचा अवलंब करून — नव्या समाजरचनेचा पाया घालीत होती.

अबांनी पुढाकार घेतला. प्रथम आपले श्रम व द्रव्य खर्ची घातलं. नुकसान सोसण्याचं मान्य केलं नी कार्य कुशलतेनं ऐक्य व संघटना घडवून आणली. एकदम उत्साह दाखवायचा नाही. प्रारंभ केल्यावर माघार घ्यायची नाही. सर्वांचा विचार घेतल्यावाचून मोठी सुधारणा आचरायची नाही आणि कृतीवाचून सांगायचं नाही. असा त्यांनी परिपाठ ठेविला.

रेशन एकत्र आणायचं हा पहिला परिपाठ. तो नीट जमल्यावर सुटीच्या दिवशीं सर्वांचा सैंपाक एकत्र करायचा हा दुसरा परिपाठ आणि नंतर एक वेळेचा सैंपाक एकत्र, भोजनहि एकत्र असा तिसरा परिपाठ. सहा महिन्यांच्या आंत तिन्ही कुटुंबांचे सैंपाक, जेवणखाण एकत्र आलें. काटकसर आपोआपच होऊं लागली.

मग तिन्ही कुटुंबांनी वाडीच्या तोंडाशीं भाजीचं व किरकोळ वाण-जिनसाचं अशी दोन दुकानं काढलीं. सर्व बायकांनी आळीपाळीनं दुकानांत बसायचं मान्य केलं. दुकानं चांगलीं चालूं लागलीं. या तीन कुटुंबांना लागणारी भाजी व वाणजिनसा फुकटांत पडूं लागल्या! — सर्व स्थानीं अबांची देखरेख! विश्वासानं विश्वास वाढला. अबांच्या शब्दाला किंमत आली. त्यांचा दरारा वाढूं लागला. सुमारे वर्षभरांनी एक वाण्याचं व कायस्थाचं अशीं दोन कुटुंबं या संस्थानांत येऊन दाखल झालीं. त्यांच्या बुद्धीचा व कर्तृत्वाचा उपयोग होऊं लागला.

अबांनी सर्वांनुमतें ठरवून टाकलं कीं, संस्थानाची कुटुंब घेण्याची

मर्यादा संपली! — एकत्र सैपाक, एकत्र भोजन, चालूं झाल्यावर खाजगी सैंपाकघरं तशींच राखण्यांत आलीं. ज्या कोणाला खाजगी कांहि करावंसं वाटेल, कुलधर्म कुलाचार आचरावयाचे असतील किंवा शाकाहाराव्यतिरिक्त कांही करणं असेल, त्यांनी तसं करावं. यामुळं सर्वांचं स्वातंत्र्य अबाधित राहिलं.

एकोप्यामुळं सर्वंच बायकांना विश्रांति व फावला वेळ मिळूं लागला. लागलीच अबांनी पापड, सांडगे, मसाले, निरनिराळीं चवदार तिखटें — मेतकूटें काढण्याचा व इतर कुटुंबांना पुरवण्याचा कारखाना सुरू केला. समान भांडवल, समान श्रम, समान खटाटोप आणि कामाप्रमाणं लागलीच वेतन असा धारा सुरू झाला. प्रत्येक बाईला स्वतःचं धन मिळूं लागलं!

आचार विचार एक झाले. राहणी एक झाली. अभिरुचि समान झाली! जातपात उच्चनीचपणा — छेः कुणाला स्मरणहि होईना. अबा एक म्हातारा ब्राह्मण पांची कुटुंबांचा चालक. इतर सर्व स्त्रीपुरुष, मुलंबाळं त्यांची आज्ञाधारक! — आपण लहान आहोंत व आपल्याला सांभाळून नेणारे अबा आहेत, यांतच सर्वांना आनंद! यांतच सर्वांना अभिमान! यांतच सर्वांचं सौख्य!

ही माहिती ऐकून मी खरोखरच आश्चर्यचकित झालें. अबा जोगदेवा-सारख्या एका सामान्य गृहस्थानं पांच कुटुंबं एकत्र आणिलीं, त्यांची एकजूट घडवली आणि त्या ऐक्यावर सर्वांनाच थोडं थोडं, आर्थिक स्वास्थ्य लाभलं! — केवढं समाज कार्य हें!

सुशिलाताईबरोबर मी वाडींत शिरलें. मन उत्फुल्ल झालं होतं. एका समाधानकारक स्थानांत आपण प्रवेश करतों आहों याची धन्यता वाटत होती. भडक असं कांही नव्हतं. तशी माझी अपेक्षाहि नव्हती. पण आंत जातांच तिथं राहणाऱ्या सर्व माणसांना जातां येतां सहज दिसेल असा एक

फळक अक्षरांचा फळा दिसला! — आणि मी जागच्या जागीं थांबलें.

फळ्यावर हीं वाक्यं होतीं:

॥ श्री ॥

स्वच्छता हा आमचा परमेश्वर.
सौजन्य ही आमची उपासना.
उद्योग आमचा धर्म.

गोड भाषण व नम्रता हा आमचा आचार
ऐक्य संवर्धन एवढा एकच विचार
चला. अंधारांतून प्रकाशांत या. परस्परांच्या संगतींत
— सुखी व्हा —

समोर देवालय दिसल्याप्रमाणं मी त्या फलकाला मनोमन प्रणाम केला. मी माझ्या बहिणीबरोबर आंत — घरांत — गेलें. सर्वांनी माझं मनापासून स्वागत केलं.

अबा कांही लिहीत बसले होते. मी त्यांच्यापुढं जाऊन त्यांना वाकून नमस्कार करतांच त्यांनी मला आशीर्वाद दिला. लेखन बंद ठेवलं. आणि नंतर आदरयुक्त स्वरांत म्हटलं, "या या — कुमुदताई या. तुमच्या आगमनाची वार्ता आमच्या सुनबाईंनी आम्हांला दिली होती. ठिक — ठीक. तुमच्या तिकडं सर्व कुशल? — छान! छान! सुशिलेकडून तुमचं कर्तृत्व आम्हांला कळलंय् बरं का. तुम्ही पैसा मिळवतां याबद्दल तुमचं पहिलं अभिनंदन. तुम्ही विवाहित आहां व संसारहि करतां याबद्दल दुसरं अभिनंदन. आणि तुम्ही एकत्र कुटुंबांत आहां, याबद्दल तिसरं अभिनंदन."

मी संकोचलें. गप्प बसलें.

थोड्या वेळानं मी त्या मोठ्या संसारांत — बायका मुलांत मिसळून

गेलें. लग्नाचं वऱ्हाड जमल्याप्रमाणं माणसं. तशीच गडबड. पण त्यांत कलकलाट नव्हता. घाई नव्हती. वातावरण शांत व समाधानी. पुरुषां-पुरुषांच्या गप्पा चालू होत्या. कांही बायका सैंपाकांत होत्या. कांही पाट-पाणी घेण्याच्या तयारींत होत्या. कांही वृद्ध व पोक्त देवाधर्मांत होत्या. मुलें खेळत होतीं. मोठी मुलं सायंस्तोत्र म्हणत होतीं. सगळं वातावरण ब्राह्मणी ! -- शुचितायुक्त !

दोन पूर्ण दिवस व तीन रात्रीं मी त्या संस्थानांत राहिलें. सर्वांच्या परिच-याची झालें. किती तरी नव्या गोष्टी शिकलें. अबांच्या सान्निध्यांत राहून त्यांच्या गप्पा ऐकल्या. आपआपलीं कामं उरकत असतां हसून खेळून गोष्टी करणं कांही अवघड नव्हतं.

अबा म्हणाले, " आमच्या येथील ही कल्पवृक्षाची खांदी बेलाशाक ने बरं का. पांच पांच कुटुंबाचं एक संस्थान अशा पन्नास कुटुंबांची एक पेठ आणि अशा पांच दहा पेठांची एक वस्ती झाली तर पोलिस नको, ग्राम-पंचायत नको. निवडणुकी नकोत. आम्ही आपल्यापुरती सुधारणा करूं तरी देशाची सुधारणा होईल. केल्यानं होतं. जमवून घेतल्यानं जमतं. उद्योग केल्यानं जीवन निर्वेध होतं. संपत्ति मिळतं. ज्याला आपलं म्हटलं, त्याला सर्वस्व देऊन टाकण्याची तयारी असली पाहिजे. आणि असं असलं म्हणजे कोणी याचना करीतहि नाही."

अबांच्या या साध्या बोलण्यांत केवढा अर्थ होता ! त्यांनी नवं असं कांही सांगितलं होतं का ? — कांहीच नाही. बोलायचं नाही. करून दाखवायचं. हा त्यांचा बाणा होता.

त्या रात्रीं अंथरुणावर पडल्या पडल्या मी विचार करूं लागलें. जाऊ-बाईंनी मला असंच कांहो सांगितलं होतं. आईनं मला झिडकारीत हेंच सांगितलं. आज अबांनी त्याचीच आवृत्ति केली ! — आणि या तिन्ही प्रकारच्या परिपाकानं जेव्हां मी जीवनाचा विचार करूं लागलें, त्यावेळीं मला कळून आलं कीं, जाऊबाईंशीं वागण्यांत पहिली चूक मजकडून झाली.

सामान्य प्रतीच्या मैत्रिणींत बसून मी जी स्वतःच्या घरांतील चर्चा केली, ती पहिली चूक. बरं केली — पैज लावण्याचा अचरटपणा कां केला ! — बरं केला. मग हा प्रकार गंमत म्हणून जाऊबाईंना सांगायला काय हरकत होती ? — त्यांनी तोड काढून पैज जिंकण्याचा मार्ग नसता कां सुलभ केला ? — छे:, दादरला जातांच पहिली गोष्ट ही करायची, जाऊबाईंना पूर्ण शरणागतीचं पत्र टाकायचं. आपण बुद्धीनं लहान, वयानं लहान. ताठा पाहिजे कशाला ? पांच भिन्न भिन्न जातीचीं कुटुंबं एकत्र नांदू शकतात. मग भावाभावांना व जावांजावांना गुण्यागोविंदानं राहण्यास हरकत कोणती ?

– १५ –

## रक्त आणि अश्रू !

कुल्यांस आल्यानंतर चवथे दिवशीं मला परत जाण्याची परवानगी मिळाली. माझ्याकरितां म्हणून सुशिलाताईसहि दोन दिवस माहेरीं धाडण्याचं तिच्या सासूनं ठरवलं. त्या दिवशीं ऊन उतरल्यावर आम्ही लोकल गाठली. सुखरूप दादरला आलों.

मावशी व मालू आमची वाट पाहत होत्या.

पांच कुटुंबांचा परिवार मी पाहून आल्यामुळं तो विषय मला अगदी आवडीचा झाला होता. नवं खेळणं मिळालेल्या मुलाप्रमाणं मी हुरळून गेलें होतें.

सुशिलेला तो विषय तिच्या सासरसंबंधीं म्हणून त्याविषयी चर्चा करण्यांत व नव्या नव्या प्रकारें गुणानुवाद गाण्यांत आनंदाचा होता. दोन दिवस आम्ही इतर गमती जमती अनेक केल्या. पण त्यांत वरील विषयाचं बोलणं कितीदां तरी निघालं.

सुशिला म्हणाली सुद्धा : "एखादा प्रभावी चित्रपट पाहिल्याप्रमाणं तुला झालं आहे. डोक्यांत विचारांची व हृदयात भावनांची खळबळ उडून गेलेली दिसते तुझ्या."

मी हसत तिचं म्हणणं मान्य केलं.

दोन दिवसांनी सुशिला परत कुर्ल्याला गेली. मीहि आपल्या गांवीं परतण्याचा विचार करूं लागलें. कारण, मला दादरला येऊन आठवडा होत आला होता. मावशीनं ' वसंतराव आल्यावर जा. वरचेवर येणं थोडंच होतं. ' म्हणून म्हटलं. ' जावेला तसं पत्र टाक म्हणजे झालं. ' असंहि सुचवलं.

ती सूचना ऐकतांच मी चपापलें ! — नवलं असं कीं, मी मुंबईला सुखरूप पोचल्याचं साधं एक कार्ड टाकण्यासहि विसरलें होतें !

" छे: ! — " त्या रात्रीं मी निश्चय केला, " उद्यां जाऊबाईंना सविस्तर पत्र लिहावयाचंच. कुर्ल्याची सर्व हकीगत लिहावयाची. तसं आपल्या कुटुंबांत राहिलं पाहिजे असं सुचवायचं. आणि आपल्याकडून चुकल्याचं सफशेल कबूल करायचं.

बाकी घरीं पत्र टाकलं नाही, याची मला भारी चुटपुट लागली. जाऊबाईंची क्षमा मागायला आपण उत्सुक असतां हें विस्मरण कसं झालं ? — गोष्ट अप्रिय म्हणून ? — माझा मलाच या गोष्टीचा राग आला. जी गोष्ट वेळेवर घडत नाही, ती मग तितकी महत्त्वाची ठरत नाही. चुकीबद्दलचा खेद तात्काळ दाखवायला नको का ?

" उद्यां पत्र गेलंच पाहिजे — " मी स्वतःला पुन्हा बजावलं. शेजारून वाचण्याकरितां म्हणून आणिलेलं एक मासिक चाळीत बिछान्यावर पडलें. **वाग्बाण** ! — या मथळ्याचा एक लेख सहज तयाडोळे भरला. वाचूं लागलें. सुरुवातीलाच चार ओळींचा एक इंग्रजी उतारा होता :

" It seems so easy to forgive and forget—for you. But it is seldom easy for the other fellow. You get relief from the explosion, but he is the one who has to suffer the wounds. "

— ' क्षमा करा नी विसरा ' हें वाक्य तुमच्या दृष्टीनं सहज असतं

परंतु तुमच्या वाग्बाणांनी घायाळ झालेल्या व्यक्तीला तें कसं बरं वाटणार? —— तुम्ही संतापानं उफाळून मोकळे होता. पण ज्याला त्याचे चटके बसले, त्याच्या हृदयाला जखमा होतात त्याची वाट काय ?

याच्याच खालीं गडकऱ्यांचं वाक्य होतं : 'बाण जेथून सुटतो, तिथं त्याची कांहीच खूण नसते. पण जिथं तो जाऊन डसतो, तिथं जन्मभर याद राहील अशी जखम करतो —— '

मला सबंध लेख वाचण्याचं कारण उरलं नाही. किंबहुना पुढं कांही वाचावं असंहि वाटेना. मी मासिक बाजूला टाकलं. उशाल्गत असलेला विद्युद्दीप मालवला. अंधारांत वरील छताकडे पाहत पडलें! — पत्र आल्या-बरोबर टाकायला हवं होतं. तिथल्यातिथंसुद्धा जाऊबाईंना बरं वाटेल असं आपण काय केलं? केवळ वळणं घेत क्षमा मागण्याचं सोंग करणं नी स्वत:चा कान पकडून मोकळ्या मनानं क्षमा मागण्याचा हट्ट धरणं यांत फरक नाही का?—— जाऊबाईंनी बोलायला सवड दिली नाही, खोटी गोष्ट. माझी इच्छाच तितकी तीव्र नसली पाहिजे.

आता वाचलं त्यांत याचं उत्तर आहे.

— दुसरा दिवस उगवला! — मी वेणी फणी करतें न करतें तों माझ्याच नांवाचीं दोन पत्रं आलीं. एक माझ्याच पुतण्याचं — माधवाचं — कार्ड. आणि पुष्कळ कागद असलेलं एक जाड लांबडं पाकीट. जाऊबाईंच्या हस्ताक्षराचं.

माधवाचं कार्ड अगदी साधं – पण मला बोचणारं होतं. "काकू, तूं पोंचल्याचं कुशलपत्र नाही. काळजी वाटते. ती सौ. ताई तुझ्या पत्राची वाट पाहत आहे. कांही राग असल्यास सारें विसरावें, असें तिचें सांगणें आहे. तिनें तुला एक स्वतंत्र पाकीट टाकलें आहे. त्याचें उत्तर सवडीनें द्यावें. पण तत्पूर्वी कुशलपत्र येऊं दे. ती.राजा काका महाबळेश्वरावरून तिकडे कोंकणांत गेले आहेत. आम्ही सर्व खुशाल आहों. तुमच्या मावशींना आमचा सर्वांचा प्रणाम सांगावा."

माधवचं पत्र वाचतांच मला हें कळून चुकलं कीं, आपला पश्चात्ताप खरा असला तरी आतां तो वाया गेलेला आहे. पत्र पाठविण्यांत दिरंगाई झाली ही फार मोठी चूक.

असं कसं चुकलं आपल्या हातून? मी हळहळत म्हटलं. दोन्ही पत्रांकडे दीन मुद्रेनं पाहिलं.

"कुमुद, आंग धुवून घेणार ना?" मावशीनं आंतल्या खोलींतून विचारलं. "आलें" म्हणून मी उठलें. बाईंचं पत्र फोडून पाहण्याचं धैर्य मला झालं नाहीं. दोन्हीं पत्रं बॅगेंत टाकलीं व मी पुढच्या कामाला लागलें.

मनाचा सारा ताजेपणा मावळला होता. माधवाच्या पत्रांतील वाक्य 'ताई तुझ्या पत्राची वाट पाहते आहे.' हें एकाद्या ओरखड्याप्रमाणं झोंबूं लागलं. या वाक्याला कांही विशेष अर्थ असेल का? ताईंना माझ्याकडून केवळ कुशलपत्राची अपेक्षा असेल का? — कीं, आपल्या धाकट्या जावेनं 'चुकलं बरं माझं —' एवढं तरी म्हणावं, पत्रांतून तरी झाल्यागेल्या गोष्टीबद्दल खेद दर्शवावा असं ताईंना वाटलं असेल का? — होय. प्रेमाच्या भाषेप्रमाणं माणसाला आर्जवी भाषाहि हवी असते. बाईंना माझ्या त्या साध्या नम्रतेची आवश्यकता वाटत असेल का? — काय सांगावं? त्या मानी आहेत. प्रेम देऊनहि जी मुलगी प्रेम देत नाही, हृदयानं हृदय जाणत नाही, तिच्या नम्रभावाची आशा करा कशाला? — असंहि त्यांनी ठरवलं असेल. त्यांनी मामुली कुशल पत्रासंबंधीं मुलांजवळ वाच्यता केली असावी. — मग त्यांनी आज जें एवढं लठ्ठ पत्र पाठवलं आहे, तें कां? एकदा फोडून वर वर पाहूं का?

मन अशा अस्वस्थ विचारांत असतांच मी आंगधुणं, धुणंपाणी करणं आणि मावशीला थोडं साह्य करणं इत्यादि गोष्टी यांत्रिक पद्धतीनं केल्या. मधे राहवेना म्हणून पाकीट फोडून आंत काय असावं तें पाहिलं. मुलाच्या आखीव वह्यांतील सुमारें वीस चतकोर होते. पहिल्याच पानावर मजकूर होता:

## गेल्या दोन वर्षांत रायकर कुटुंबांत झालेला जमाखर्च

सौ. कुमुदबाई यांना —

विनंती कीं, पुढच्या पानावर आपल्या एकत्र कुटुंबांत झालेला जमाखर्च ठोकळ रूपांत दिला आहे. पै न् पैचा खुलासेवार जमाखर्च मोठ्या वहींत आहे. तुम्हीं इथं आल्यावर दाखवीन. सध्या पाठविला आहे, तो तपासून पाहावा. जो खर्च योग्य वाटणार नाही किंवा उधळमाधळ झाल्याप्रमाणें वाटेल, त्यावर खुणा कराव्या. तो मी सोशीन. तुमच्या व भाऊजींच्या मिळकतीमधून, मुलांच्या शिक्षणाकरितां व श्यामाच्या लग्नाकरितां विमे उतरले आहेत, तिकडे प्रिमीयम भरण्याकरितां खर्च झाला आहे. त्याची रक्कम मी शेवटीं दाखविली आहे. ती मी वाटणीपत्र तयार होतांच देऊन टाकीन. तेव्हां पुन्हा विनंती कीं, न संकोचतां किंवा त्रासतां, जमाखर्च पाहून तशी सही करावी. व्यवहारमध्ये चोख असणं दोघांना श्रेयस्कर. — आपली कचकच पुरुषापर्यंत न्यायची नाही, हें आपण ठरवलं आहेच. तुम्ही जपा मी जपतें आहेंच. शेवटचा धागा तोडण्याचं अपयश मी घणार आहें. तुमच्याकडे कसलाच दोष येऊं देणार नाहीं, ही खात्री बाळगावी.

सौ. अंबूताई रायकर.

पुढचीं पानं चाळण्याचं धाडस मला झालं नाही. वरील मजकुरानं बाई कोणत्या मनःस्थितींत आहेत, हें मात्र स्पष्ट झालं. पत्र पुन्हा बॅगेंत कोंबलं माल्‌ व मावशी यांच्यांत जाऊन मिसळलें.

सबंध पत्र रात्रीं पाहावं, असं मी खिन्न मनाला सुचवलं. जाऊबाईनीच असा कठोर मार्ग धरल्यास आपण काय करायचं ? — माझं मन जास्त व्यथित होत चाललं.

अकराच्या आंतच आमचीं जेवणं आटोपलीं. मला अन्न विषवत् वाटलं. एवढासा भातच कसा तरी कोंबून मी उठलें. मावशीनं ‘ कां ग ! ’

म्हणून प्रश्न केला. 'प्रकृति बरी नाही.' मी जबाब दिला. मावशी किंचित् हसली व म्हणाली, "कांही नवं जुनं आहे वाटतं ?" — पोक्त बायकांची ठराविक शंका नी भाषा. मी कांही न बोलतांच पानावरून उठलें. — मोरीवर जाऊन हात तोंड धुतलं. बाजूला गेलें. चटई पसरून पहुडलें.

यावेळीं मला पूर्ण एकान्त हवा होता. माझ्या एकान्त माडीचं मला स्मरण झालं. आमची घरवळ डोळ्यापुढं आली. मावशीचं घर फार परकं वाटूं लागलं. स्वतःचं घर, स्वताचीं माणसं, आठवूं लागलीं. माझं अंतःकरण भरून आलं.

इतक्यांत शेजारच्या एक बाई आल्या. मी कां निजलें ? याची चौकशी. मावशीचं त्यांचं कांही बोलणं झालं. "या दोघीहि आता दूर कुठंतरी जाऊन बडबड करतील तर ?" मी त्रासत स्वतःशीं म्हटलं.

तोच देव पावला. शेजारीणबाई मुंबईला निघाल्या होत्या व मावशीला बरोबर नेण्याचा त्यांचा विचार होता ! — मला किती हायसं वाटलं. मी एकदम उठलें. त्यांच्याकडे गेलें. मावशीचा नकार मोडून काढला माल्र 'मी जाणार' म्हणाली.

सुमारे पंधरा मिनिटांत मी आजीनातीची उचलबांगडी केली. शेजारीणबाई खुष झाल्या. त्या बाहेर पडतांच "लौकर परता अं" असं औपचारिक बोलून मी कडी लावून घेतली.

हवा होता तो एकान्त मला मिळाला. पण पुढं काय करावं ? हें मला सुचेना. अगदी उघड्या माळावर वाट चुकलेल्या प्रवाशाप्रमाणं माझी स्थिति झाली.

विमनस्कपणे मी बॅग पुढं घेतली. उघडली. दोन्हीं पत्र वरच होतीं. विशेष कारण नसतां मी माधवचं पत्र पुन्हा वाचलं. कुशलपत्र टाकणं आव-

श्यक आहे. तें आजच्या आज करतां येईल. अं — हं, केलं पाहिजे. मी स्वतःला बजावलं. जाऊबाईंच्या पत्राचे चतकोर टवकारून पाहत होते. जणूं त्यांचा प्रश्न होता, “ माझं उत्तर काय देणार ?” — मग पहिल्या चतकोरावरचा मजकूर आठवला. वेगळं होण्याचा कठोर निर्णय जाऊबाईंनी एकदमच कां घ्यावा ? —.मधल्या कांही पायऱ्या, कांही उपाय नाहीतच कां ? — मी विवाहित झाल्यापासून आतांपर्यंतचं सासरचं जीवन शोधलं. पहिल्यापासून कांही बिघाड घडला का ? — नाही. जाऊबाईंनी मला अत्यंत प्रेमानंच वागवून घेतलं यांत शंका नाही. बरं, मी मोठी गैर वागलें असेंहि नाही. मग जाऊबाईंना असं कां वाटावं ? — आणि वडिल जाऊ या नात्यानं त्यांनी असं ठरविल्यानंतर धाकटी जाऊ म्हणून मला काय सांगतां येणार ?

माझी विषण्णता वाढली.

“ जाऊबाईंचं म्हणणं तरी काय आहे ?” मी आपल्याशीं बोललें आणि तें लठ्ठ पत्र पुढं घेतलं. पहिलं पान एकदा वाचून पाहिलं. त्यां मजकुरांत रागापेक्षा विषाद विशेष दिसला.

त्यानंतर जवळ जवळ आठ चतकोर सुवाच्य पण बारीक अक्षरांत लिहिला होता जमाखर्च. तो इतका व्यवस्थित व कळण्यासारखा होता कीं, मी चकित झालें. वरचेवर पानं उलटून सुलटून पाहत असतां माझ्या लक्षांत आलं कीं, भाऊजी व जाऊबाई यांचा संसार सर्वतोपरी आम्हा दोघांवर अवलंबून आहे असं मुळीच नाही. दुसरी एक गोष्ट लक्षांत आली अशी कीं, आम्हा पतिपत्नीकडून जमा झालेल्या रकमांचा हिशेब फारच चोख होता.

अलीकडील तरुण स्त्रीपुरुषांत आर्थिकदृष्ट्या हिशेबी असण्याचा गुण फारसा नाही. मी तरी या बाबतींत अजागळच होतें. माझ्या मैत्रिणींमध्ये मजकडून हात उसने पैसे घेणाऱ्या बहुतेक साऱ्या होत्या. त्यासंबंधींचं

टिपण मजकडे नव्हतं. आपले पैसे परत मागण्याची मला अक्कल नव्हती व आठवणहि राहत नव्हती. पण समोर असलेल्या जमाखर्चावरून मला आढळून आलं कीं, गेल्या दोन वर्षांत मी पन्नास पाऊणशे रुपयाला तरी डच्चू खाल्ला आहे! — आणि या साऱ्यांचं टिपण जाऊबाईंनी पाठविलेल्या जमाखर्चांत होतं. तो प्रकार ध्यानीं येतांच मी स्वतःशींच ओशाळलें!

ताईंनी इतका काटेकोर हिशेब कां ठेवला होता? – केव्हां तरी तूं मीचा प्रसंग येईल म्हणून का? त्यावेळीं आपण दोषी ठरूं नये या दूर दृष्टीनं कां त्यांनी ही सावधगिरी घेतली? विचार करितां मी आणखी भुईंत गेलें!

जमाखर्चानंतर सदर होतं : घरांतील भांडींकुंडीं, चांदीचीं भांडीं, उंची वस्त्र प्रावर्ण व फर्निचर वगैरे यादीचं. इथंहि तीच व्यवस्था. तोच बारकावा. तीच प्रांजल दृष्टि. शेवटीं टीप होती ती अशी :

सौ. कुमुदबाई यांना, वर दिलेल्या यादीप्रमाणं आपली समाईक जिंदगी आहे. त्यांची निमेनिम वाटणी व्हायला कांहीच हरकत नाही. थोडी तडजोड व तारतम्य राखलं म्हणजे झालं. पण यांतहि एक गोष्ट मी तुमच्या नजरेला आणितें. तुम्ही येणाच्या आगंमागंच भाऊजींचा पगार येऊं लागला. तुमचं दोघांचं वेतन घरांत येऊं लागल्यामुळं मला थोडं शेफारल्याप्रमाणं झालं. तुमची स्वतंत्र मालकी मी अजीबात विसरलें. 'माझं — माझं' म्हणून हव्यास धरला. संसार नेटका व टापटिपीचा असावा म्हणून झटलें. उधळमाधळ मी केली नाही. पण खर्च झाला. पुढं याचा विचार करण्यास बसल्यावर दिसून आलं कीं, घरांतील बरीच भांडींकुंडीं, फर्निचर आणि उपयुक्त वस्तु यांचा संग्रह तुमच्या व भाऊजींच्या पैशामुळंच झाला. अगदी काटेकोर स्मरत नाही. पण खुणा केलेल्या वस्तु निःसंशय तुमच्या पैशामुळं घरांत आल्या आहेत. अर्थात् त्या त्या वस्तूंवर खरी मालकी तुमची आहे. वाटणीच्या वेळीं ही गोष्ट लक्षांत घेऊन त्या त्या वस्तु तुमच्या म्हणून बाजूला काढाव्या नी मग समसमान वाटणी करावी. तसा आपपर भाव तुम्हांला करायचा नसला तर तुम्ही जशी वाटणी कराल

ती मी मान्य करीन. मात्र यांत माझी मानखंडना न होईल याला तुम्ही जपलं पाहिजे. कांही तरी एवढं तेवढं दिल्यासारखं वा घेतल्यासारखं करून 'झाली निम्मी वाटणी.' असं मानण्यास मी तयार नाहीं. मला कमी मिळालं, चालेल. पण त्यांत अन्याय वा अपमान नसावा. फुकाची कृपा नसावी. जें माझं नाही, तें मिळावं अशी इच्छा तिळमात्र नाही. तेव्हां वाटणी होत असतां किंवा तुम्ही करतांना ही गोष्ट लक्षांत ठेवावी. मला वाटतं, एवी तेवी आपण वाटण्या करून दूर होणार. मग एकमेकांचीं मनं कशाला दुखवायचीं! कुमुदताई, हृदयाची जखम लौकर बरी होत नाही. हें मी सांगायला पाहिजे असं नाही. त्या पापाला जपू या. अगदी मोकळ्या मनानं, हसत खेळत दूर होऊं या.

सौ. अंबूताई.

वरील टिपण मी एका झटक्यांत वाचूं शकलें नाहीं. पहिल्या पांच सहा ओळींचं कांही विशेष वाटलं नाही. पण पुढं वाक्यावाक्यागणिक मी थांबलें. आपला पायाखालचा आधार सुटतो आहे, आपला तोल जातो आहे व आपण कुठं तरी खोल–अंधारांत–जातों आहों असं मला वाटूं लागलं. भय, चिंता व लज्जा यांनी मी व्याकुळ झालें. मी दचकून पाहिलं. भोवतालचा एकान्त मला असह्य झाला! — अत्यंत गांगरलेल्या दृष्टीनं मी त्या कागदाकडे पाहत राहिलें.

अंबूताई! — त्या सहीतून जाऊबाईंचं मुख दिसलं. कोण कोणते भाव होते त्यावर! — मला त्यांच्याकडे पाहण्याचा धीर होईना. मी गुडघ्यांत मान घातली. माझ्या हृदयांत विलक्षण कालवाकालव झाली. — खरोखरच मी त्यावेळीं कोणत्या अवस्थेंत गेलें, हें मला आतां नीट सांगतां येत नाही. एवढं खरं, जाऊबाईंनी वरील टिपण लिहितांना स्वतःच्या हृदयांतील रक्त नी डोळ्यांतील अश्रू यांचा उपयोग केला असला पाहिजे.

पालथी कलंडलें, आतां आठवत नाहो, पण मी कांही काल तरी रडलें — मुसमुसून रडलें — असं वाटतं.

— आणि मग मला जाऊबाईंच्या त्या उद्गाराची आठवण झाली. "कुमुद, तूं पाठीकडून वार केला आहेस. तुझा प्रतिकार मी कसचा करते!" — जाऊबाई तेच उद्गार पुन्हा काढून कण्हत आहेत असा मला भास झाला. मी पटकन् उठून बसलें. भोवतालीं पाहिलं. अंधार अंधार वाटला. मी ओढलेल्या स्वरांत म्हटलं, "ताई — ताई मी इतकी दुष्ट नाहीं हो. कां दूर लोटतां मला? —"

शून्यांत मी कुठंतरी पाहत बसलें. बाह्य जगतांत– मुंबापुरीसारख्या अफाट नगरींत – आढळणारी व कान बधीर करणारी तीच ती धावपळ व गडबड चालू होती. आणि शेकडों बिऱ्हाडांनी गजबजलेल्या एका चार पांच मजली चाळींतील एका खोलींत मी अनाथाप्रमाणं बसून राहिलें होतें.

मी किती काळ तशी बसून राहिलें कोण जाणे! पण कढ ओसरतांच मी उठलें. मोरीवर जाऊन हातपाय तोंड धुतलं. माठांतील गार पाणी टाळू-वर थापून घेतलं. पदरानंच डोकं टिपत मी पुन्हा पहिल्या जागीं आलें. खालीं पाहिलं. गुंताविलेले चतकोर आव्हान देत होते.

"हें शेवटपर्यंत वाचलंच पाहिजे, नाही का?" मी स्वगत म्हटलं, "जाऊबाईंची एवढी आज्ञा मला मानलीच पाहिजे." मी खालीं बसलें. मुकाट्यानं मी कागद हातीं घेत पुढचं पान काढलं. यावर स्थावर मिळकती-संबंधी माहिती होती. रायकरांचा वाडा, त्याच्या चतुःसीमा व पलीकडचे शेजारी वगैरे.

मला त्या वर्णनांत कांही समजलं नाही. गोडीहि वाटली नाही. त्या खालच्या टीपेकडं मात्र माझं तात्काळ लक्ष गेलं. तो मजकूरहि सुख-कारक नव्हता.

"एका वाड्यांत — जवळ जवळ — राहून दोन चुली मांडणं दोघा

भावांच्या मनाला पटणार नाही. मुलांना तें फारच चमत्कारिक वाटेल आणि मी स्वतःच्या मनाचं कांही सांगूं इच्छित नाही. म्हणून मी, मुलं व त्यांचे वडील यांच्यासह गांवच सोडणार आहें. घर सोडून आम्ही वनवासांत जातों आहों असं मुळीच नाही. ती सारी व्यवस्था मी नीट केली आहें. जावा जावा भांडल्या नी धाकट्या जावेनं थोरलीला घराबाहेर काढलं असा बोभाटा न होईल याबद्दल आपण दोघी दक्षता घेऊं. तुम्ही तशी कांही काळजी करूं नये. अगदी मजेंत निरोप घेऊं.

सौ. अंबूताई.

मी सुस्कारा टाकला. जाऊबाईंनी सर्व बाजूंनी विचार केला होता त्यांची तयारी होती. पण माझी होती का?—कोणाचं कोणावाचून आडत नाही. मृत्यूनं शिक्कामोर्तब केल्यावर आपण कधीं तक्रार करतो! आलेल्या भोगाला सादर होतोंच. पण जिवंतपणीं—समजत असतां—निर्वाणीचा प्रसंग येणं वा ओढून घेणं, कसं बरं वाटेल? मी तयार होतें का त्या प्रसंगाला?

मला ओरडून सांगावंसं वाटतं, कीं, मी मूर्ख व गर्विष्ठ आहें पण दुष्ट खास नाही. मी वेतन मिळवतें याचा ताठा माझ्या अंगीं आहें. पण माझी मिळकत फक्त स्वतापुरतीच खर्च पडावी वा संग्रहित व्हावी असा हीन विचार माझ्या मनाला कधीच शिवला नाही. त्याचप्रमाणं पति-समवेत वेगळं राहण्याच्या कल्पना. माझ्या मनांत मुळीच आल्या नाहीत असलं सोंग मी करीत नाहीं. पण त्या उत्कट कधीच नव्हत्या हेंहि तितकंच खरं.

याच दृष्टीनं माझ्या जाऊबाईंचा कस लावला तर? त्यांच्यांतहि हीण नव्हतं. मी रागाच्या भरांत त्यांना कधी dictator म्हटलं, कधी aristocrat मानलं व कधीं despot हि ठरवलं. पण असं असूनहि त्यांच्या थोर हृदयाची व प्रेमळ अंतःकरणाची मला जाणीव होती. माझ्या

भोवतालच्या जगांत त्यांच्या योग्यतेची स्त्री क्वचित्‌च होती. मला त्यांच्याविषयी प्रेमादरभाव होताच. तात्पर्य, दुजाभाव, दुष्टावा वा कलहप्रियता आम्हा दोघींतहि नव्हती.

मग सध्याचं किल्मिष निर्माण कां व्हावं?

मी स्वतःचा निषेध करीत म्हटलं, "किल्मिष कसं उद्‌भवलं हा प्रश्न आता नाही. तें निस्तरायचं कसं हा आहे. मला वेगळं राहण्याची तीव्र इच्छा आहे, हें ताईंनी पक्कं गृहीत धरलं आहे. तो त्यांचा गैरसमज दूर करायचा कसा?—समोर पडलेल्या कागदांनी सांगितलं: परिस्थिति निरुपायिक झाली आहे. जाऊबाईंशीं पुन्हा तोच स्नेह जोडतां येणार नाही. कुटुंबांतील एकोपा भंगलेला आहे! आलेल्या भोगाला सादर असलं पाहिजे.

अगतिकता!

निराशा, खेद, स्वापराधाची खंत वाढली. दुःसह झाली! माझं अवसान गळत चाललं. चित्ताची व्याकुलता एकदम वाढली या शक्तिहीनतेमुळं मला बसवेना. मी आडवी झालें. उश्याला हात घेऊन कलती निजलें. डाव्याहातानं चतकोर पुढं ओढले. चाळा म्हणून मागचीं पुढचीं पानं उलट सुलट केलीं. तों ध्यानीं आलं: स्थावरासंबंधींच्या हकीगतीनंतर आणखी कांही मजकूर आहे. —उताणी झालें. कागद छातीवर धरलें. या नव्या मजकुराचं मूळ शोधलं. ताईंचं पत्र होतं तें.

पहिल्या ओळींत दोनच शब्द होते:

"प्रिय कुमुद"

खडबडून जागी झाल्याप्रमाणं मी तटकन् उठून बसलें. "जाऊबाईंना मी अद्याप प्रिय आहें तर?" मी नवल करीत उद्गार काढले. पदर कसा तरी खांद्यावर टाकून मी पत्र वाचूं लागलें.

## — १६ —

# प्रेमळ पत्राचा आघात !

प्रिय कुमुद,

" सदैव सुखी अस. " असा आशीर्वाद मी तुला अंतःकरणापासून देतें. आणि तुझ्याविषयी माझ्या मनांत कसलंहि किल्मिष नाही, हें स्पष्ट करण्याकरितां माझं हृदय उकलून दाखवितें. तूं समजूतदार आहेस. या पत्राचा भावार्थ तूं सहानुभूतीनं लावशील अशी मला आशा आहे. देव तुझं कल्याण करो.

प्रिय बाळे, आपल्या कुटुंबाची एकंदर स्थिति कशी आहे व पुढं आपण दोघींनी कसं वागायचं नी काय काय करायचं याचा आराखडा सोबत दिलेला आहेच. तो लक्ष देऊन वाच. सारं कांही नीट समजून घे. त्यांत कांही चूक आढळली किंवा सुधारणा हवी असली तर समक्ष सांग. तें जमण्यासारखं नसलं, कागदावर लिहून आण. तूं सांगशील त्याप्रमाणं वागण्याची माझी तयारी आहे. अगदी निर्मळ मनानं नी हसतमुखानं वेगळ्या संसाराची घडी बसवूं या.

हा झाला जिंदगीचा विचार. आतां दुसरी बाजू नातं व मान राखण्याची. तुला बरोबरीची जाऊ मानायची व तितकाच मान द्यावयाचा ही गोष्ट. यालाहि माझी पूर्ण तयारी आहे. तुझे अधिकार समान मानायचे, तुला हवा तो बहुमान द्यावयाचा आणि घरांत व लौकिकांत

एकेरी शब्दानं तुला संबोधावयाचं नाही, हेंहि मला मान्य आहे. मी त्यांत कसलाहि कमीपणा मानणार नाहीं. फक्त एकच गोष्ट मला स्पष्ट केली पाहिजे: तूं माझी जाऊ झाल्यानंतर मी तुला मनानं तुच्छ लेखलं नाहीं. किंवा तुझा अपमान होईल असं वागलें नाहीं. गेल्या अडीच वर्षांचा काल ध्यानीं आण नी सरळ विचार करून पाहा. जावेपेक्षासुद्धा मी तुला धाकटी बहीण मानीत होतें व तशी वागत होतें. तुला मी कमी मुळीच लेखलं नाहीं. फक्त वयानं लहान मानलं. हें चुकलं असलं, घडून गेलं. तूं आता तें विसरून जा.

खरंच सांगतें. तुला तुम्ही या बहुमानानं संबोधणं मला कसं तरी परकेपणाचं वाटतं. आपल्याजवळचीं लहानसान माणसं त्यांना कशाला द्यायचा पोकळ बहुमान ? यापेक्षा प्रेमाचं एकेरी बोलणं बरं असं मनानं घेतलं. आज या क्षणाला हें पत्र लिहितांनासुद्धा 'तुम्ही' हा शब्द तुझ्या-करितां योजणं माझ्या अगदी जिवावर आलं. विश्वास ठेव. तशा प्रकारें पत्र लिहिण्याचा प्रयत्न मी चार सहा वेळा केला. पण मला तें साधलं नाही. आंतून मला भडभडून आलं. डोळे अश्रूंनी ओथंबले व हात कांपूं लागला. कुमुद, कसं सांगूं तुला ? पण तूं मला परकी नाहीस ग. 'तुम्ही' लिहून तुला कशी दूर सारूं ?

पण मनाला असं कांही वाटत असलं तरी मला तुझ्या इच्छेकडे व अपेक्षे-कडे पाहिलं पाहिजेच. एकेरी संबोधनांत लिहिलेलं माझं हें पत्र शेवटचं आहे हें निश्चित समज. रागावूं नकोस. चूक सहृदयतेनं पाहा. पुढच्या कालांत तुला हवा तो बहुमान देत राहीन. अंतर पडणार नाही —"

मला पत्र पुढं वाचवेना. गळ्यांत हुंदका दाटला. डोळ्यांतून अश्रू झरूं लागले. वरील मजकुरांतील एकहि शब्द मला खोटा वा कृत्रिम वाटला नाही. साऱ्या मजकुरावर ताईच्या जखमी हृदयांतून उडालेल्या रक्ताचे थेंब दिसत होते.

" ताई — ताई " मी आक्रंदून म्हटलं, " मला इतकी दुष्ट, मानाची लोभी ठरवूं नका हो —" पालथी पडून मी हुंदक्यांना वाट दिली. किती अनाथ – अनाथ वाटलं मला !

कांहीं वेळानं शोक आवरला. नाक तोंड पुशीत मी उठून बसलें. पत्र संपूर्ण वाचणं भाग होतं. मी बाजूला टाकलेले कागद हातांत घेतले व पुढचा मजकूर वाचूं लागलें.

" प्रिय कुमुद, या पत्रानं माझ्या मनांतील कांही विचार ज्यांचा संबंध तुझ्याशीं आहे, ते सांगून टाकायचे असं मी योजिलं आहे म्हणून पत्र किती लांबेल याचा विचार करीत नाहीं. तूंहि विस्तार पाहण्यापेक्षा आशय समजून घेण्यावर लक्ष ठेव.

आपल्या दोघींच्या जीवनांत अलीकडे जी दुःखद घटना घडली, तिचा विचार मी ' आपलं काय चुंकलं असावं ? ' या दृष्टीनं केला. या आत्मपरीक्षणांत असं आढळलं कीं, मी कालाचीं पावलं नीट ओळखलीं नाहींत. मला वाटतं, कालाचीं पावलं म्हणजे काय, हें तुझ्या ध्यानीं चटकन् येईल. मागं एकदां या मथळ्याचा एक लेख एका मासिकांत आल्याचं तूं मला सुचवलं होतंस. पुढं तो लेख मी मुद्दाम वाचला. त्यांतील कांही उतारे मी आपल्या बाडांत उतरून घेतले आहेस. त्यावेळीं सदर लेखाकडे माझं लक्ष फारसं गेलं नाही. पण आज वाटतं, त्यांतील कांही विचार मी ध्यानीं घ्यायला हवे होतें. खालचा प्यारा आपल्या स्थितीला लागूं पडण्यासारखा आहे.

कालाची गति मोठी विलक्षण आहे. तो कोणत्या दिशेनं धावतो व कोणीकडे जातो त्याचं आपल्यास ज्ञान नाही व भानहि नाही. पण त्याचं स्वरूप काय व तीं तो कशी पालटतो, हें जाणण्यासारखं आहे. किंबहुना आपल्या दोन्ही अंगाला घासून चालणारा काळ कसा आहे ? त्याचीं पावलं कशीं पडताहेत ? हें ओळखणं म्हणजे जीवनाचा अर्थ लावण्यासारखं आहे.

ज्याला हें कळेल व जो तसा वागेल तो शहाणा. त्याला जीवनांतील गुंतागुंत गोंधळांत पाडणार नाही.

या दृष्टीनं आजच्या कालाकडे पाहिलं तर काय दिसतं ! त्यांत गतिमानता व नटवेपणा जास्त आहे. जाहिरातबाजी, बाह्य चमचमाट व अवडंबर हे त्याचे प्राण दिसतात. सिनेमा हें त्याचं मोठं प्रतीक आहे म्हणण्यास हरकत नाही. प्रत्येक गोष्ट धावती, झटकन् बदलणारी, परस्पर विसंगत, भपकेदार व तावत्काल उपयुक्त अशी असली म्हणजे झालं ! — मौज तर खरीच. पण सद्यःकाल असं स्पष्ट सांगतो किंवा दाखवितो कीं, आंत नसलं तरी चालेल पण बाहेरून दिसलं पाहिजे. उदाहरणच घेऊं. श्रीमन्ती ! विद्वत्ता ! प्रेम ! कर्तृत्व ! या साऱ्या गोष्टींना सताचा व सत्याचा आधार पाहिजे? हा पूर्वीचा धारा. आता ? — श्रीमन्ती नसली, चालेल; पण दिसली पाहिजे. विद्वत्ता ? नसली चिन्ता नाही. किंबहुना नसावीच ती; पण ती दिसली पाहिजे. त्याचप्रमाणं जीवनाचा खरा आधार म्हणजे प्रेम. तें खरंच असावं नाही का ? — होय. पण आजचा बोलता — नाचता — गाता सिनेमा सांगतो : प्रेम ! प्रेम ! ! — पडद्यावर दिसलं म्हणजे झालं ! आंत असलं पाहिजे असं मुळीच नाही. — हींच कालाचीं पावलं !

सृष्टीच्या क्रमांत दिसतं. ऋतु पालटला कीं सृष्टीचं स्वरूप बदलतं. जसा ऋतु तशी सृष्टि ! तसं मनुष्याचं होतं का ? जसा कालप्रभाव तसा माणसाचा स्वभाव बनत जातो का ? — कांही सांगतां येत नाही. पण एकूण जनसमूह बाह्यावडंबराला जास्त भाळूं लागला आहे असं स्पष्ट दिसतं. कल्चर मोती, कृत्रिम हिरेमाणकं, हुंडी रेशिम, पुडीचे रंग, बिनवासाचीं फुलं, भपका देणारं अत्तर एक कीं दोन प्रकार सांगावे — साऱ्या स्थानीं अस्सलाला खो ! — अर्थात् या सर्वांचा परिणाम माणसाच्या आचारविचारावर, राहणीवर, मनावर झाला असल्यास नवल काय ?

नसलं तरी चालेल पण दिसलं पाहिजे. मनांत नसलं तरी चालेल; बाहेर दाखवतां आलं पाहिजे!

प्रिय कुमुद, स्वतःकडे भलता मोठेपणा घेत नाहीं व तुला हिणवतहि नाहीं. पण मला वाटतं, कालाचीं हीं पावलं मी जाणलीं नाहींत. जगांतलि इतर माणसांच्या झुंडींतच मी आहे. दुसऱ्याला कशाला नाक मुरडूं. पण आज वाटतं कीं, आपल्या दोघींच्या सांसारिक जीवनांत नव्या कालाचें हे नवे रंगढंग मी थोडे तरी आणायला हवे होते. परंतु मी इथं आंधळी राहिलें. परिणाम काय झाला? — तुला सहज देतां येण्यासारखं वरवरचं प्रेम, वरवरचा मान मला देतां आला नाही. मी उगीचच कृपण राहिलें. दोषी ठरलें!

आता असं वाटतं, माझं पहिल्यापासूनच चुकत गेलं कीं काय? — मला नीट उलगडा होत नाही. पण काय घडलं तें सांगतें. रायकर कुटुंबांत मी मुख्य गृहिणी. संसार सुरळीत चालविण्याचा भार माझ्यावर. तेव्हा त्या अधिकारांत आपण राणीप्रमाणं वागण्यांत व अधिकार गाजविण्यांत चूक काय? — तुझ्या समजुतीप्रमाणं मी dictator झालें ते या पद्धतीनं. यजमान, भाऊजी, मुलं यांना सौख्य समाधान पाहिजे असेल तर माझ्या तंत्राप्रमाणं त्यांनी चाललं पाहिजे; असं मी मानलं. तशी वागलेंहि. नवल एवढंच वाटतं कीं, माझ्या या कुटुंबियांपैकी एकानंहि माझ्या अधिकाराचा वा अहंकाराचा प्रतिकार कसा केला नाही? — आपल्या हुकूमशाही वृत्तीनं मी त्यांची बुद्धि व विचारशक्ति पांगळी केली कीं, त्यांच्या सुखार्थ मी स्वतःच्या सुखाकडे पाहिलं नाहीं याचं पुण्यबळ त्यांना बोलूं देईना? — मला तें कोडं आहे. मात्र तुझ्या आचारविचाराची मला आज जी प्रचीति आली आहे ती लक्षांत घेतल्यावर वाटतं, माझीं मुलं — माधव ते माधवीपर्यंत मनांतून बंडखोर झाली नसतील ना? ती स्वतंत्र होण्याची संधि पाहत असतील का? — कांही असो. तो विचार उद्याचा आहे.

प्रिय कुमुद, पुढं आमच्या घरीं तुझं आगमन झालं. तूं परक्याची पण तुझ्या साध्या वागणुकीवरून वाटलं, मुलगी आपलीच आहे. तुझा तो हस-ण्याचा प्रसंग आठवतो ? — तूं बालहृदयी–सहज स्वभावी– होतीस म्हणू–नच तुला हसू लपवणं व कृत्रिम गांभीर्य आणणं साधलं नाही, नव्हे का ! मला तरी तसं वाटलं. पुढं अनुभव तोच आला. तूं आमच्यांत एकदम मिसळलीस. माझा अधिकार मानणं किंवा कह्यांत राहणं याचं तुला कांहीच वाटलं नाही. — मला वाटतं, इथं तूं चुकलीस तें कांही असो. तूं आल्या-पासून आतापर्यंतचं आपलं सांसारिक जविन सुखासमाधानांत गेलं यांत शंका नाही. आणि या स्थानीं, कुमुद, मी मनापासून सांगतें तूं फारच चांगली मुलगी आहेस. असा माझा अनुभव आहे.— कांही अपरिहार्य कारणानं आपण यापुढं एकत्र नांदू शकणार नाहीं. जाऊं दे, त्याचं काय एवढं ! — पण तुझं वर्णन करायचं झालं तर मी अभिमानानं सांगेन कीं, माझी धाकटी जाऊ हाडानं गरीब, आचाराविचारानं सालस, बोलण्या–वागण्यांत सभ्य, मनानं उदार आणि हृदयानं प्रेमळ आहे.

तेव्हां यापुढं तूं व मी दूर झालों तरी तुझ्या माझ्यांत सख्य राहण्यास कांहीच अडथळा येणार नाही. तुझ्या स्वतंत्र संसाराकडे मी कौतुकानं पाहीन नी प्रेमळ आशीर्वाद देत राहीन. ”

पत्र वाचतां वाचतां मी पुन्हां थांबलें. ताईच्या वरील लिहिण्यांतहि त्यांच्या मनाचा मोकळेपणा स्पष्ट दिसत होता. माझ्या विषयीचं त्यांचं मत केवळ वरवरचं नव्हतं. त्यांनी वर म्हटल्याप्रमाणं आमचं साहचर्य आम्हा दोघींनाहि सुखासमाधानाचं होतं. मला आठवतं, कधी मधी त्या मला न्हाऊं माखूं घालीत. अगदी प्रेमानं, हौसेनं. त्यावेळीं त्या मला माधवी पेक्षाहि लहान मानीत. थट्टा विनोद करीत व मी त्यांना मनापासून प्रिय असल्याचं दर्शवीत.

आज या गोष्टी त्या जणूं साफ विसरल्या होत्या. अगदी शांत मनानं

त्या मला दूर सारीत होत्या. त्यांच्या दृष्टीनं इष्ट झालेला समान अधिकार व मान त्या मला बहाल करीत होत्या !

केवढं मनोधैर्य होतं त्याचं हें !

मी सुस्कारा टाकला व पत्र पुढं वाचूं लागलें —

" प्रिय कुमुद, मनुष्यस्वभावाचा विचार करतां आज तरी तुला "माझ्याविषयी तुला काय वाटतं ? " असा प्रश्न करणं बरोबर होणार नाही. पण अनुभवावरून वाटतं, माझ्याविषयीं तुझ्या मनांत सद्भावच असावा. राग असेल पण मन कलुषित नसावं.

तेवढ्या आधारानं मी न्याय मागतें. —तुझ्या आरोपाप्रमाणं मी माझ्या गृहराज्यांत अरेराव होतें पण अन्यायी नव्हतें अशी माझी मनोदेवता मला साक्ष देते. कुटुंबांतील सर्व लहान थोरांच्या सुखाकरितां व स्वास्थ्याकरितां मी झटलें, सर्वांना समानबुद्धीनं वागवलं, सर्वांवर मनापासून प्रेम केलं आणि मला योग्य वाटलं तेवढं स्वातंत्र्यहि दिलं. तुझी व भाऊजींची मिळकत मी ताब्यांत घेत होतें. पण त्याविषयी तुम्हा दोघांवरहि माझं कडक नियंत्रण नव्हतं. तुला हव्या त्या वेळीं पैशाची उचल करतां येत होती. फक्त मला गृहकर्ती या नात्यानं तुमचा हिशेब हवा होता. सांग कुमुद, यांत माझा कांही अपराध घडला का ! — माझ्या आवडी निवडी तुमच्यापेक्षा वरचढ किंवा तुम्हांला न रुचणाऱ्या होत्या का ? – मग या त्यागाच्या बदल्यांत मी तुम्हा सर्वांकडून मोठेपणा मागितला, आज्ञापालनाची इच्छा धरली किंवा आग्रह धरला तर त्यांत खरंच बिघडलं का ? — माझी मनोदेवता मला सांगते कीं, इतरांप्रमाणंच मी तुला वागवलं. धाकटी जाऊ म्हणून तुच्छ केलं नाहीं किंवा प्रतारणाहि केली नाहीं. — हे सारं ध्यानीं घेतलं म्हणजे नवल असं वाटतं कीं, कुटुंबातील तुझ्या समान अधिकाराला यामुळं बाध कुठं येतो ? व तुझ्या मानापानांत कमी काय पडतं ? — पण मग उमज पडला. कालाचीं पावलं आपण ओळखलीं नाहींत. बाजारांत

चालू असलेलं नाणं व्यवहारांत उपयोगायचं असतं. प्राचीन कालचं नव्हे. मी शिवशाहींतील अस्सल सोन्याचा होन पुढं केला, हें चुकलं ! — सोनं म्हणून त्याला किंमत. नाणं म्हणून नाही ! — कुमुद, माझा पराभव भी मान्य करतें.

आपला दोघींचा खटका उडाला तो दिवस मी विसरणार नाहीं. तुझा मेजवानीचा बेत, तो पार पाडण्याचा तुझा हट्ट, तुझ्या मैत्रिणींचा हैदोस, माझ्याकडे येऊन मला उपदेश करण्याची त्यांची उठाठेव व त्यानंतर तूं अमर्यादेनं दिलेला सामना — या सर्व प्रकाराला आता कांही किंमत नसली तरी त्याच्या बुडांत असलेला अर्थ मला लौकर उमगला. मानहानी-मुळं झालेली जखम मी बाजूला ठेवली. शांतपणें विचार केला. तुझ्यापुढं आलेले कागदपत्र त्यामुळं जन्माला आले.

आज हें पत्र लिहितांना हृदयांत कालवाकालव निःसंशय होते. पण कालाचीं पावलंहि ओळखतां येतात. सद्यःकालांतील मुलगी तूं. माझ्यापेक्षा दहा वर्षांनी लहान. तुझ्या मनाचा ओघ वेगळा असावयाचा या भरांत तुला संसारांतलि समान अधिकार वेगळ्या प्रकारें हवे असले किंवा बाहेरची तुझी प्रतिष्ठा घरांतहि पाहिजे असं तुझ्या मनानं घेतलं तर त्यांत बिघडलं कुठं ! — तुझा न्याय मी समजूं शकतें. तो पाळायचा तर — वेगळं होणं हाच एक मात्र उपाय आहे — ”

मी जणूं बाई पुढं आहेत असं मानून एकदम म्हटलं “ कां — कां — कां ! — मला सांभाळून कां घेत नाही ! ”

पत्राचं उत्तर असं होतं —

“ प्रिय कुमुद मला हटवादी – दुराग्रही – चढेल – अरेराव म्हण. कांहींहि म्हण. पण स्पष्टच सांगतें. या चमत्कारिक परिस्थितीला मुकाट्यानं मान लववणं नी जुळतं घेणं मला साधण्यासारखं नाही. मी त्याग करूं शकतें पण माझा मान गमावूं शकत नाहीं ! — मोठा स्वभाव दोष आहे

हा! — हा मजकूर वाचतांना तुला हसूं येईल का? — होय. येण्याचा संभव आहे. एवढच नव्हे तर तुझ्या ओठांवर असा एक प्रश्न येईल कीं, "ठीक उद्या माधवची बायको — तुमची सून—आल्यावर काय करणार? ती तर आणखी अर्वाचीन असणार! ती कशी वागेल, किती अधिकार मागेल, काय सांगावं?"

माझं उत्तर तुला समर्पक वाटणार नाही. पण सांगतें. सून आल्यानंतर काय करायचं? — हा दूसरा विचार मी केलेला नाहीं. आज मी ताठच राहणार व माझ्यापुढं — ज्यांना मी आपलं म्हणतें — त्यांची अयोग्य मात्रा चालूं देणार नाहीं! माझं शरीर विगलित होईपर्यंत व माझी बुद्धि स्थिर असेपर्यंत माझं कौटुंबिक राज्ञीपद सोडायला मी मुळीच कबूल नाहीं! — या क्षणाला मला वाटतं: कुमुद माझी धाकटी जाऊ आहे. माझ्या हाताखालीं असेपर्यंत तिनं मी सांगेन त्याचप्रमाणं वागलं पाहिजे. माझ्या आज्ञेवाचून तिला कांही करतां येणार नाही. — बाहेर ती शिक्षकीण असूं दे नाहीतर आणखी मान सन्मान मिळवूं दे. घरांत आल्यावर ती कोणी नव्हे. तिचा पगार, तिचं शाळेंतलि शहाणपण नी तिचा बाहेरचा सन्मान — घरांत उपयोगी पडेल फक्त कौतुक करण्यापुरता! —त्यांचा टेंभा ती माझ्यापुढं — मला दिपवण्याकरितां — करूं लागली तर? मी आधी तिचं मुस्कट रंगवीन नी तिची पायरी तिला समजावून देईन. हें जमण्यासारखं नाही असं स्पष्ट दिसून आलं तर — आज तो मार्ग मी अनुसरला आहें."

मी वाचन थांबवलं. वरच्या दोन चार वाक्यांत माझ्या जाऊबाईंचं सत्य स्वरूप होतं. खरं स्वभाव चित्र होतं. आम्हां कुटुंबियांना तें भयप्रद होतं. आदरणीयहि होतं. फणा उभारलेली नागीण त्या होत्या कीं, मागं पुढं पाहत जाणारी सिंहीण होत्या कीं, तुपाची आहुती घेतलेली त्या अग्निज्वाला होत्या! — काय सांगतां येणार? — मला त्याचं सान्निध्य हवं असेल तर

त्यांच्यापुढं नम्र होण्यावाचून दुसरी गति नव्हती !

मी कागद सरळ धरलें व पुन्हा वाचूं लागलें.

“ प्रिय कुमुद, तूं हळव्या मनाची आहेस, हें मी जाणतें. वेगळं होण्याची कल्पना तुझ्या मनाला धक्का देईल, असंहि वाटतं. तूं असासुद्धा विचार करशील : ताई एकदम एक घाव दोन तुकडे का करूं इच्छितात ? कुठंतरी तडजोड नाही का करितां येणार ? — कुमुद तोहि विचार केला. पण त्यांत यश येणार नाही. आज आपण तडजोड किंवा डकवाडकवी करूं. पण फार लवकर आपले स्वभाव आपल्याला नडतील. माझ्या स्वभावांतलि ताठपणा —दोषच आहे तो. — मला तुझ्याकडून योग्य तें आज्ञापालन, नम्रता व मृदु भाषा हवी असणार ! .— आणि कालप्रवाहाप्रमाणं तुला समान अधिकार व सन्मान हवा असणार ! मैत्रिणीच्या रूपानं जग तुला डिवचणार किंवा फूस देणार सांग बरं. कसं जमायचं मग ? — कटकटी व धुसफूस वाढत जाईल. आपण दोघी एकमेकीला वाईट दिसूं लागूं. अप्रि- यहि होऊं. वाग्बाण सोडण्याचं भान कुणालाच राहणार नाही. यामुळं हृदयाला केवढ्या जखमा होतील ? — नको बाळे, तो प्रसंग ओढवून घेणं आपल्याला शोभणार नाही. कुलाची प्रतिष्ठा म्हणून कांही आहेच. ती आपण सगळ्यांनी सांभाळली पाहिजे.

प्रिय कुमुद, पुढचं लिहितांना माझ्या मनालासुद्धा यातना होत आहेत. आंतून उसळणारे अश्रु आवरत नाहीत. आपल्यापुढं मोठंच कटु कर्तव्य आहे. पण तें अंतिम हिताचं आहे. केलं पाहिजे असं आहे. वाईट वाटूं देऊं नकोस कुमुद. धैर्यानं तयार हो. हाय न खातां ऊठ. आपल्याला आपल्या पुरुषांच्या समजुती काढावयाच्या आहेत. सारी निरवानिरव भले- पणानं करावयाची आहे. आणि मुलांच्या मनावर भलते परिणाम न व्हावे याला जपायचं आहे. बाळ, प्राप्त कर्तव्य नीट समजून घे. न संकोचतां

वाग. — यांतील अपयश माझ्याकडे ढकल. महेश्वराची पदवी हवी असेल तर विषपान मला केलं पाहिजे नाही कां?

निर्णय लौकर घेणं दोघींच्या हिताचं.

— ये, लाडक्या मुली, माझ्या बाहूंत ये. मनोमन तुला क्षेमालिंगन देतें. तुझं मस्तक हुंगते. तुझं मुख कुरवाळतें आणि तुला सुखी हो असा आशीर्वाद देतें. पतीसह संसारांतील सर्व सुखं भोग नी चिरंजीव हो! तुझ्या गालावर माझे अश्रु गळताहेत कां? — दुर्बलतेची क्षमा कर बाळे. पत्र संपवतें इथंच.

सदैव तुझीच — सौ. अंबूताई.

पत्र केव्हा व कसं संपलं, मला कळलं नाही. फक्त त्याचा आघात शरीरावर व मनावर विलक्षण झाला. सगळीकडून अंधार जमूं लागला. अंगाला कसलं तरी गार वारं झोंबूं लागलं! — तोंडाची चव बिघडली व तें कोरडं वाटूं लागलं. कांहीतरी गरगर फिरणारं आपल्या मस्तकावर कोसळतं आहे असा मला भास झाला. तें चुकविण्याकरितां मी भुईसरपट झालें! निपचीत पडलें.

* * *

" कुमुद — ए कुमुदताई " दारावर थापा व हाका ऐकूं आल्या. मी चपापून उठलें. अंगांत कांही त्राण नव्हतं. मस्तक व तोंड घामानं डबडबलं होतं. बावरत मी खालवर — भोवताली — पाहिलं. पडलेले कागद आवरून बॅगेंत कोंबलें. उठून कडी काढली.

तीनचा सुमार होता या वेळीं. मला कांही होतंय हें मावशीला सांगावं लागलं नाही. 'तिनं डॉक्टर आणूं का' विचारलं. मी नकार देत तारेचा फार्म मागितला. स्वतःच्या सहीनं ताईंना तार केली —

**पत्रं पोंचलीं. मी आजारी आहें. काळजी करूं नये. तावडतोब या. मला घेऊन जा.**

**— कुमुद.**

## – १७ –

# काळी काळी रात्र. नंतर सकाळ !

मी मावशीला म्हटलं, "तूं उगचि घाबरूं नकोस. काळजी करण्यासारखं असं आंतून मला कांही होत नाही. स्वस्थ पडून राहिल्यानं मला उद्या सकाळीं चांगलं बरं वाटेल. डॉक्टरांना बोलावण्याची सुद्धा जरूरी नाही. — मला स्वस्थ पडूं दे."

मावशीनं 'बरं' म्हणून मान डोलावली. पण ती थोडीशीं अस्वस्थ झालीच. बरोबरच आहे. मी तिची भाची असलें तरी परक्याची मुलगी. तिच्या घरीं पाहुणी म्हणून आलेली. हलगरज झाली असा दोषारोप मला न यावा असं जपणं तिला भाग होतं. तिनं एका पार्टिशनच्या आड मला स्वच्छ अंथरूण घालून दिलं. मागून चांगला चहा करून आणिला. खरं म्हणजे मला खाणंपिणं कांही नको होतं. तोंडाला चव नव्हती. पोटांतून इच्छा नव्हती. तरीपण मावशीला बरं वाटावं म्हणून चहा घेतला. 'आता बरं वाटतंय्' असंहि म्हटलं. पण तेवढ्यानं तिचं समाधान झालं नाही. तिनं त्यांच्या नेहमीच्या डॉक्टरांना एकदा येऊन जा म्हणून निरोप पाठविला.

बाकीच्या भानगडीकडे लक्ष न देतां मी स्वस्थ पडून राहिलें.— मनाशीं हिशेब सुरू झाला: "तार अर्जंट केली आहे. संध्याकाळच्या आंत ती

पोचायला हरकत नाही. ताई सकाळच्या गाडीनं निघतील. म्हणजे उद्यां संध्याकाळपर्यंत त्या इथं यायला पाहिजेतच. — मग लागलीच निघायचं बघायचं — आपल्या घरीं जाऊन पडलेलं बरं. झाला एवढा शहाणपणा पुरे झाला —"

तितक्यांत डॉक्टर आले. त्यांनी मला तपासावं अशी मला बिलकूल इच्छा नव्हती. ते बिछान्याजवळ येतांच मी चटकन् उठून बसलें. पदर नीट सावरला व शाळेंतील सरावाप्रमाणं त्यांना नमस्ते केला. नंतर मी त्यांना शांतपणें इंग्रजींत म्हटलं, "मी उन्हांत हिंडल्यामुळं मला थोडा त्रास झालाय् एवढंच. मला इतर कोणताहि आजार नाही. तेव्हां तुम्ही प्रकृति तपासण्याचं कारण नाही. मावशीच्या समजुतीकरितां तुम्ही साध्या कांही पुड्या पाठवून द्या. मला पाहिजे फक्त विश्रांति."

डॉक्टर पोक्त वयाचे अनुभवी होते. ते किंचित हसले. त्यांनी हातांत घेतलेला स्टेथास्कोप खिशांत कोंबला. त्यांना माझं बोलणं पटलं. त्यांनी एक दोन मामुली प्रश्न विचारीत माझी नाडी पाहिली. "यांना फक्त विश्रांतीची जरुरी आहे" असं मावशीला सांगितलं. "झोप लागण्याच्या दोन पुड्या पाठवितों. औषधाचं उद्यां पाहूं" इत्यादि बोलत त्यांनी निरोप घेतला.

मी डॉक्टराशीं इंग्रजीत बोललें याचं मावशीला मोठं कौतुक वाटलं. शिवाय त्यांनी माझ्या प्रकृतींत काळजी करण्यासारखं कांही नाही हें वरचेवर सांगितल्यामुळं तिला थोडाफार विश्वास आला. मला स्वस्थ पडून राहण्याची संधि मिळाली. पण ती जेवढ्यास तेवढी. आठ दिवसाच्या माझ्या राहण्यानं आजूबाजूला ओळख झाली होती. मी आजारी आहें व डॉक्टर येऊन गेले, ही बातमी थोडी खळबळ उडविणारी होती. अर्थात् ही बाई आली, ती आई आली, त्या काकू आल्या — अशी गडबड झाली. सर्वांनी बायकी निदान ठरवलं. मला कांही दिवस गेले असले

पाहिजेत. पहिलटकरीण. फार जपलं पाहिजे इत्यादि.

माझ्या अत्यंत व्याकुळ झालेल्या मनाला हा समाचार — किंवा हें निदान कोठवर सुखकर झालं असेल हें माझं मला माहीत. "मला स्वस्थ पडूं दे ग —" असं मी कितीदा तरी कळवळून म्हटलं. स्वतः अगदी सुंभ होऊन पडायचं ठरवलं तरी त्याचा फारसा उपयोग झाला नाही. बरं, जगाला तरी काय दोष द्यायचा? —त्याला नेहमी उठाठेव लागते. खरी खोटी सहानुभूति दाखवावयाची असते. तात्पर्य, रात्रीं दहापर्यंत — माली व मावशी निजेपर्यंत — मला स्वास्थ्य असं लाभलं नाही. या त्रासानं माझं डोकं आणखी चढलं नी यापेक्षा मरण पुरवलं असा निर्वाणीचा उद्वेग मनांत आला.

यांत एकच सौख्य होतं. मावशीच्या त्या स्थानाला समुद्रावरून येणाऱ्या वाऱ्याचा फायदा भरपूर मिळत होता. डासापिसवांचा किंवा ढेकणाचा त्रास नव्हता. माझं अंथरूण खिडकीशीं होतं. यामुळं त्यांतल्या त्यांत थंड व मोकळं वाटत होतं. स्वस्थ डोळे मिटून पडल्यास कदाचित् पटकन् झोप लागून जाईल अशी एक आशा मनांत उद्भवली. उद्या जाऊबाई आल्या कीं, त्यांच्याशीं मनमोकळेपणानं बोलूं. त्यांच्या पत्राचा विचार केला म्हणजे असंच दिसतं कीं, त्यांनाहि वेगळं होण्यांत फारसं सुख नाही. मग चिंतेंत कां पडायचं? — संसारांत आपण ठरवूं तेंच घडतं. उगीच विषण्ण होण्यांत अर्थ काय? — इत्यादि विचार मनांत आले. झोप येईल या आशेनं मी स्वस्थ पडून राहिलें.

पण माणसाचं मन इतकं समजूतदार — चटकन् स्वस्थ होण्यासारखं कुठं आहे! — आपणच शंका घ्यायच्या. विचारांची गुंतागुंत करायची आणि भरकटत सुटायचं. भयाचीं, निराशेची, दुःखांची, अडचणींचीं किंवा चिंतेचीं चित्रं आपणच तयार करायचीं आणि मग आपणच भ्यायचं निराश व्हायचं, रागवायचं किंवा घोर चिंतेंत पडायचं! या चंचलतेला पारावार नाही.

अल्पावधींत माझी ती अवस्था झाली. शरीर निस्त्राण. मन व्याकुल व आपण परस्थानीं आहोंत, ही जाणीव. विचारांचं काहूर विलक्षण उठलं !– काय हा संसार नी काय हें जीवन !

बाल्य काल आठवला. आपण मोठ्या कां झालों ? — विवाहाच्या भानगडींत कां पडलों ? — स्वतंत्र कां राहिलों नाहीं ? — आईबापांनी तरी संसारांत ढकलण्याची कारवाई कां केली ?

— साक्रीकरबाई मनांत आली. तिचं एकलं जीवन चालूं आहे. ती आहे का सुखांत ? — तिचा तो क्लेम. ती आशानिराशा. स्नेह जुळविण्याची व चालूं ठेवण्याची ती धडपड ! — छेः, आपण विवाहबद्ध झालों, हें कांही फारसं चुकलं नाही ! — तसं व्हायला हवंच होतं.

—आपलं सासर. जाऊ, दीर, त्यांचीं मुलं आपले यजमान कोण वाईट आहे, संगतीला अयोग्य आहे किंवा दुःखदायक आहे ?— कांहीच उणं नाही. — मग खेद कशाचा ?

जाऊबाईंची संगत, त्यांचं वागणं नी इतरांना वागवून घेणं, त्यांचे विचार, त्यांचं कर्तृत्व ! — नांवं ठेवण्यासारखं काय होतं ?

— रायकरांचा तो पडका वाडा. एक बखळ होती ती. आवार दांडगं सत्तेचं. ते दैन्य कोणी नाहीसं करायचं ? — पुन्हां तिथं लक्ष्मीं नांदूं लागेल असं कोणी झटायचं ? — जाऊबाईंचं तें मनोराज्य. एका जोत्यावर बसून दोघीहि बोललों. मनोराज्य केलं. असं असं करायचं असं ठरवलं ! — आज त्यांतून काय निघालं ?

रायकरांच्या त्या उध्वस्त वाड्याला जाऊबाईंनी उपमा दिली होती आपल्या देशाची. भारत वर्षाची ! — आपला देश असाच विस्तृत आहे, समृद्ध आहे. आपला आहे. पण अत्यंत दुःखी दरिद्री आहे ! — कां ?– तेथे नांदणारी प्रजा भानावर नाही. ती एकजुटीनं, एक विचारानं, एक मनानं. कार्य करीत नाही. तसं होईल तर वैभव हातावर आहे ! — पण हें

समजून घ्यायचं कोणी?— प्रयत्न करायचा कोणी?— कशी होणार एक-जूट — एक मन!

बाई म्हणाल्या तेंच खरं. बाहेरची उठाठेव करून दंगा करण्यापेक्षा ज्यानं त्यानं आपलं कुटुंब सांभाळलं, एकोपा टिकविला आणि वैभव वाढवलं तर?— 'थेंबें थेंबें तळें साचे' कांही कमी नाही. आपआपलीं कामं करीत राहिलं कीं दुसऱ्याची उठाठेव सुचत नाही. भांडणं होत नाहीत. गुणांत स्पर्धा करायला प्रत्येकाला वाव आहे!

मग बिनसतं कुठं?

जगाचं असो. आपलं काय बिनसलं, तें पाहिलं पाहिजे!— हो, त्या खट्याळ वन्संचं तें आगमन. त्यांचं तें माझ्याविषयीचं प्रेम. ती सुंठसाखरेची वाटी! त्या दिवशीं मी जाऊबाईंच्यावर चिडलें. तें बजि का? आपसांतलि कलहाची बीजं बाहेरच्या माणसांकडून येतात का?— येत असतील. पण तीं आपण रुजवूं कां द्यायचीं! त्यांची जोपासना आपण कां करायची?

— आणि तें घड्याळाचं आख्यान!— आपण चुकलों पण बाईंनी त्याची विल्हेवाट तशी लावायला नको होती!— मला किंवा माझ्या बुद्धीला कांहीच महत्त्व नाही, काय अर्थ याचा?

या आठवणी मनांत येतांच मी त्यांतल्या त्यांत उत्तेजित झा . एकदम अंथरुणावर उठून बसलें. किती वाजले होते, कोण जाणे! पण शांतता खूप भासत होती. एक बारीक – मंद – विद्युद्दीप तेवत होता. पण त्याचा प्रकाश माझ्या आजूबाजूला येत नव्हता. मी अंधारांतच होतें. मी उशी जवळच्या भिंतीला ठेवली. तिला टेकून बसलें. पाय पुढं पसरले. हात गुंडाळून घेतले. समोर पाहूं लागलें. किती वेळ तरी त्या एका उद्वेगकारक घटनेभोवती माझं मन फिरत होतं.

इतक्यांत खालच्या कोठल्या तरी एका मार्गावरून जाणाऱ्या मोटारीच्या झगझगीत दिव्यांचे किरण जवळच्या खिडकीवाटे आंत आले. क्षणांत

नाहीसे झाले. तेवढ्या त्या अकस्मात् आलेल्या प्रकाशानं मी किती घाबरलें-बावरलें. मी चपापून उठलें. खिडकीशीं गेलें. मुंबानगरीचा तोच तो देखावा उंच उंच इमारती. एखादा मार्ग. कांही विद्युद्दीप! कांही घर घर आवाज! आगगाडीच्या शिटा!

मी दीर्घ उसासा टाकला. पुन्हां बिछान्यावर आलें. आडवी झालें. विचारांना नवी कलाटणी मिळाली.

जाऊबाईच्या वागण्यांत ताठरपणा आहे. बोलण्याचालण्यांत त्या हुकमी आहेत. दुसऱ्यावर शह राहण्याबद्दल त्या दक्ष असतात. या साऱ्या गोष्टी खऱ्या असल्या तरी त्या मनाच्याहि तशा आहेत का? — नाहीत. त्या कठोर आहेत पण कुजक्या नाहीत. हात उगारतील पण तो टाकणार नाहीत. राग करतील पण प्रेम करण्याचं विसरणार नाहीत. — याचा प्रत्यय आपल्यास एकदा नाही अनेकदा आला आहे. गेल्या दोन वर्षांत संसाराचा कोणता भार आपल्यावर पडला? — कोणती चिंता वाहावी लागली? — कोणते कष्ट जिवापाड करावे लागले? — कांहीच नाही. माहेरच्या राहण्यांत व सासरच्या राहण्यांत फरक जाणवला नाही. मग या सुख स्वास्थ्याची किंमत थोडा कमीपणा पत्करून द्यावी लागली, बिघडलं कुठं? आपल्याला इतकं अवघड कां वाटावं?

— आणि बाईंची जीवनविषयक दृष्टि आणि त्यांचे विचार. त्या बोलूं लागल्या म्हणजे मनाला किती पटतं! कितो बरं वाटतं! कोपरखळी लागणं किंवा मिळणं हें जीवनाच्या धावपळीत चालायचं. जपायचं किती नी दुर्लक्ष करायचं किती? — आपणच ठरवायचं. समजून घ्यायचं.

दुष्काळ — दारिद्य — अन्नवस्त्रांची टंचाई या जागतिक संकटांना वा दुःखांना सीमा नाही. त्यांत आपल्या भ्याडपणाची वा चिडखोरपणाची भर घालायची हा कोठला शहाणपणा! — आपल्या आळींतलि त्या

दोन तरुण मुली. संसारांत अगदी स्वतंत्र आहेत. स्वतःच्या स्वतः मालक आहेत. — आहेत का सुखी ? — किती जिगजिगलेल्या असतात ! — तरीपण हसून खेळून असतात ! त्यांच्या मानानं जाऊबाईच्या छत्राखालीं आपण सुखी नाही का ? — पावसांतून जातांना — डोक्यावर धरलेल्या छत्रीची काडी केसांत अडकते. डोक्याला खुपते किंवा क्वचित् डोळ्याला लागते ! — रागावतो का आपण ? — आणि आला राग उपयोग काय ?

परवा इकडे येतांना आगगाडीच्या एवढ्याशा जागेंत जीवनाचे किती नमुने पाहिले ! काय एकेक तऱ्हा होती ! त्या मानानं आपलीं सुखं निर्वेध व मोठीं नाहीत का ? — हें आपल्याला समजत कसं नाही ? —

हा ? — बाईच्या बाडांतील ती काजव्याची गोष्ट ! ती त्यांनी स्वतःचं प्रतीक दाखविण्याकरितां लिहिली आहे का ? — काजवा स्वतःच्या प्रकाशाचा दिमाख मिरवतो, असं वाटल्यास कवीनं म्हणावं. काजवा आपल्या एवढ्याशा मंद तेजानं आपलं जीवन जगत असला पाहिजे. जगांत अनंत कोटी पटीनं तेज ओसंडत असेल. काजव्याला त्याचं काय ? — तसं जाऊबाईच्या जीवानाचं आहे का ? — त्या घमेंडखोर आहेत, अधिकाराच्या हव्यासी आहेत, असं आम्ही म्हणावं. पण त्या आपलं जीवन जगताहेत असं कां मानूं नये ? — त्यांची आढ्यता, त्यांची हुकूमशाही व त्यांची कठोरता लक्ष्यांत घेण्याआधीं त्यांनी कुटुंबाकरितां काय केलं, हें पाहिलं पाहिजे.

आईनं सांगितलं तेंच खरं. मला उपकार स्मरले पाहिजेत. टरफलाच्या बन्धनांत बीजाला राहावं लागतं. त्यानं हें रक्षणाचं कवच नको म्हणून कसं चालेल ? आपल्या घरांतील वडील माणसांचं मिंध असणं, त्यांच्याशीं नम्र असणं ही गुलामगिरी नव्हे. तो अपमानहि नव्हे. मन सोशीक असलं पाहिजे. नाही का ?

—तेव्हां बाईंच्या पत्राचा विचार आपण फिरवला पाहिजे. हळूहळू मनं बिघडत जातील ही भीति व्यर्थ नाही. पण ती निर्माण न होईल असं आपण जपलं पाहिजे. तशी खात्री त्यांना दिली पाहिजे. यांत देवाण घेवाण कुठं होईल कां? — आम्ही चुकलों बाईंनी सांभाळून घेतलं पाहिजे. बाई कडकडूं लागल्या आम्ही सहन केलं पाहिजे, जिभेला जपलं पाहिजे. — विकाराच्या सपाट्यांत हें कठीण खरंच पण जपलं पाहिजे. लक्ष ठेवून जपलं पाहिजे.

विचार करतां करतां बाईंचं सबंध पत्र डोळ्यापुढं आलं. धाकट्या जावेला वेगळं व्हायला पाहिजे. कशाला ओढून धरा आपण. बाईंनी निर्णय घेतलेला. पण तो त्यांना सुखावह झालेला आहे का? — नाही. निःसंशय नाही. त्यांच्या दृष्टीनं तें एक मोठं दिव्य आहे. — हें आचरतांना येणारं अपयश — वाईटपणा — त्या आपल्याकडे घेणार आहेत. पण तें कसं शक्य आहे? — आपण कितीहि निर्वाळा दिला तरी ताईंच्या कर्तृत्वाला व स्वभावाला जाणणारं जग — जग राहूं दे बाजूला — घरांतल्या घरांत अप्पा काय समजतील? — मुलांना काय वाटेल? — काकू — आमची काकू म्हणून माझ्या भोवती असणारी मधु — माधवी, प्रिय शिष्या श्यामा आणि तो वयांत येत चाललेला माधव — काकूला काय समजतील?

—आणि ज्यांच्या सुखसर्वस्वांत माझा अर्धा भाग आहे, ज्यांच्या आयुष्याच्या धाग्यांत माझ्या आयुष्याचा धागा पिळला गेला आहे, आणि ज्यांच्या जिवांत जीव घालून मी सबंध आयुष्य कंठणार आहे, ते माझे यजमान काय समजतील? आपल्या वहिनींना ते आईपेक्षा जास्त मानतात. त्या वहिनी दूर गेल्यावर त्यांना बरं वाटेल? — बिचारा सरळ पुरुष. माझ्या हटवादीपणाचा परिणाम सोशील मुकाट्यानं. परिस्थिति मान्यहि करील. पण त्याचं चित्त स्थिर राहील का? — माझ्या मनाशीं त्याचं मन संलग्न होईल का? — कसं शक्य आहे? — कसं शक्य आहे? — आणि मग

जिथं हृदय मीलन नाही, तिथं दाम्पत्य सुख कसलं? परस्पर संगतीचं सुख कसलं ? – पतिप्रेमाकरितां तरी मला अहंकार गिळला पाहिजे, कुटुंबाचा एकोपा टिकवला पाहिजे. जाऊबाईंचं श्रेष्ठत्व मानलं पाहिजे. हें जर न होईल तर ? – सारं जीवन रसहीन !

सर्व जीवनाचं एक मात्र मूल्य त्यागांत आहे. आत्मविस्मृत होण्यांत आहे ! — मला तें दिलं पाहिजे. बलात्कारानं नव्हे. मुकाट्यानं नव्हे. आनंदानं — आनंदानं !

... ... ...

... ... ...

दुसरा दिवस उगवला.

गतरात्र मला सुखाची झाली नाही. दुःखद आठवणी, अनुतापाची हाय हाय व दुःस्वप्नं यामुळं मी करपून निघालें. सकाळीं मी उठलें उशीरा. पण शरीरांत शक्ति नव्हती व मनाला उत्साह नव्हता. तरी पण आपण परक्या घरीं आहोंत याची जाणीव लौकरच झाली. जाऊबाईंना तार केली आहे. याचंहि स्मरण झालं. उठवत नव्हतं तरी उठलें. मावशीनं "आता कसं आहे ? — बरं वाटतं ना ?" असं विचारलं. मी तोंड देखलं हसलें. मुखमार्जनादि उरकलं. थोडा चहाहि घेतला. "तूं स्वस्थ पडूनच राहा —" मावशी म्हणाली, "अंग धुपावंसं वाटलं धू. नाहींतर स्वस्थ पडून राहा. तुझा चेहरा फार उतरलेला दिसतो. कसली काळजी करूं नको. घर परकं मानूं नको. हवं तें माग — सांग. आलीस तशी धड पायांनी आपल्या घरीं जा."

मावशीला मी यथोचित उत्तर देऊन धीर दिला.

" तुझ्या आईला बोलवायची का तार करून ? " मावशीनं विचारलं. मी म्हटलं, " कांही नको. आमच्या ताई म्हणजे जाऊबाई आल्यानं काम भागेल. तसं काळजी करण्यासारखं कांही नाही. मग आईला तार करून तिला कशाला चिंतेत पाडायची ? "

मी वेणीफणी करण्यास आरशापुढं बसलें. माझी मुद्रा मलाच भयप्रद वाटली! मी तशी रसरशीत — प्रफुल्ल वदना होतें. पण आज तें सारें तेज लोपलं होतं. गाल चोपले होते. डोळे निस्तेज होते. केसाचा तुकतुकीतपणा नाहीसा झाला होता?

मी घड्याळाकडे पाहत राहिलें. तास मोजूं लागलें. सहाला गाडीची वेळ होती. ताई तार पोंचताच निघतील या विषयीं मला खात्री होती. पण शंकाव्याकुल मन. बाई तिथं नसल्या, त्यांना तार मिळाली नाही, त्यांची गाडी चुकली, पुढची मुंबईची गाडी सांपडली किंवा नाहीं, किंवा कांही अपरिहार्य अडचणीनं त्यांना निघतां आलं नाहीं — तर — तर — तर! मन सारखं खालवर होत होतं.

दुपार उलटली. तीन होऊन गेले. चार झाले! — मार्गप्रतिक्षा. गाडीची वेळ होण्याच्या आधी ताई आल्याचा भास. त्यांच्या आवाजाचा भास होऊं लागला. विकल होऊन मी अंथरुणावर पडून राहिलें. मिनिटा-मिनिटांनी वेळ मोजूं लागलें. माझ्याप्रमाणं मावशीहि वाट पाहत होती. तिची व ताईंची ओळख प्रथमच होणार होती. मी त्यांच्याबद्दल तिला कितीतरी सांगितलं होतं. लहानगी मालूहि नवीन एक आत्या येणार म्हणून नाचत होती.

मी मनांत ठरवून टाकलं होतं. " ताई आल्या कीं, त्यांच्या गळां मिठी मारून ढसढसून रडायचं ! "

सहा झाले !—गाडी स्टेशनांत आली असली पाहिजे. ताईंना घरा यायला किती वेळ लागेल ?—पंधरा मिनिटं – वीस- मिनिटं ! – मावशी मालू गॅलरींत जाऊन उभ्या राहिल्या. मला इच्छा असूनहि तें सामर्थ्य नव्हतं !

अन् ताई आल्या ! — कां कोण जाणे, मी भारी भारी व्याकुळ झालें, डोळ्यावर हात आडवा टाकून पडलें. गळ्यांत जोराचा हुंदका आला !

पुढचं मला विशेष कळलं नाहीं. ताईंच्या मांडींत मी डोकं घातलं होतं. एक हात त्यांच्या कमरेभोवती टाकला होता. ताईंचा प्रेमळ हात माझ्या डोक्यावरून केसांतून पाठीवरून फिरत होता. मी हुंदके दाबीत रडत होतें. मावशी माझ्या प्रकृतीचें कांहीं सांगत होती.

ताईंना माझ्या या शोकविव्हलतेचा उलगडा त्या वेळीं तरी झाला नाही. पण प्रसंगाला त्या धरि गंभीर व शांत राहणाऱ्या होत्या. संधि साधून त्या माझ्या कानांत एवढंच बोलल्या, " मी आलें आहे ना ? – आतां घाबरायचं नाहीं. रडूं रडूं करायचं नाही. हें घर परकं आहे. आपल्याला लौकर आपल्या घरीं जायचं आहे ना ! — त्रास करून घेऊं नको. चिप् ! तोच धाकाचा स्वर ! तेंच प्रेम ! यानंतर त्यांनी मला जेऊं घातलं असावं व थोपटून निजवलं असावं.

* * *

मी जागी झालें त्यावेळीं बाहेर चक्क उजाडलं होतं. ताई माझ्याजवळच बसून होत्या. मी डोळे उघडतांच ताईंनी माझ्यावर झुकून माझं तोंड कुरवाळीत म्हटलं, " झोंप झाली छान ! — ऊठ. तोंड धुवायला पाणी इथं आणून देऊं कीं मोरीवर येतेस ? "

मी शांतपणें मोरीवर जाण्याचं कबूल केलं. रात्रभर शांत झोंप लागल्यानं

मला बरंच त्राण आलं होतं. ताईंचं साह्य एवढं तेवढं घेत मी शौचमुख-मार्जनादि विधि उरकलें. चहा घेतला. ताईंनी माझी वेणीफणी केली. " आंग धुणार ? " त्यांनी विचारलं.

" बंब पेटलाय् ? " मी हलक्या सुरांत विचारलं. त्यांच्या उत्तराची वाट न पाहतां मी उश्यालगतची बॅग पुढं घेतली. त्यांतलि जाऊबाईंनी पाठविलेलं पुडकं काढलं. त्यांतलि त्यांच्या पत्राचे कागद तेवढे निराळे काढून ते बॅगेत टाकले. आणि नंतर वरच्या पाकिटांसुद्धा ते कागद धुण्याच्या पिळ्याप्रमाणं पिळून ते ताईंच्या पुढं केले नि म्हटलं, " एवढं बंबांत टाका पाहूं.

—माझ्या गळ्याची शपथ ! "

आम्ही दोघींनी एकमेकीकडे पाहिलं. जाऊबाई क्षणभरच घुटमळल्या. " मी जिवंत राहावं असं वाटत असेल तुम्हांला तर ते कागद बंबांत गेले पाहिजेत—" ताईंनी अनुमति दिली. त्या जाऊं लागतांच मी आणखी म्हटलं, " मला थोडं बोलायच आहे तुमच्याशीं. घरीं जाण्यापूर्वी. — जरा मला शक्ति आली कीं, आपण बीचवर जाऊं नी बोलूं. "

" बरं —" ताई आशीर्वादाच्या भाषेत म्हणाल्या.

... ... ...

अगदी तिन्ही सांजा आम्ही दोघी जावा समुद्रकिनारीं जाऊन पोचलों. संधिप्रकाश संपला होता, काळोखाची छाया पडूं लागली होती. वाढत्या चंद्राची कोर आकाशांत दिसत होती. दूर दूर दिव्यांच्या मालिका दिसत होत्या. समुद्र हसत होता. लाटांचं तांडव सुरू होतं ! वाराहि हेलकावे खात जात येत होता.

सर्वत्र गजबजाट होता. शांतताहि होती !

आम्ही दोघी दूर एकांतात — जाऊन बसलों. दोघीहि मूढ होतों. एक-

मेकीशीं फारसं बोलतहि नव्हतों. समोर क्षितिजापर्यंत पोचलेला सागरावर चंद्रमा— माझं हृदय भरून आलं. अद्याप मला ढसढसून रडायचं होतं. घरांत ती संधि मला मिळाली नव्हती.

आम्ही बसल्यावर किती वेळ गेला कोण जाणे. ताई माझ्या अगदी जवळ होत्या. त्या शांत स्वरांत म्हणाल्या, "कुमुद, तुला कांहीं बोलायचं आहे. बोल ना —"

"अगदी मनमोकळेपणानं मी रुद्ध कंठानं विचारले. चेहरा न दिसण्यासारखा काळोख पडत चालला होता. यामुळं माझ्या प्रश्नाचा परिणाम ताईंच्यावर काय झाला मला समजलं नाही. पण ताईंचा हात माझ्या पाठीवर आला. मला किंचित जवळ घेत त्या म्हणाल्या, "सांग, कुमुद, तुला काय बोलायचं असेल तें मनमोकळेपणानं बोल—"

"बोलूं, काय बोलूं — ताई काय बोलूं मी— " मी हुंदका दाबीत म्हटलं, "ताई, मी तुमची अपराधी आहें— फार अपराधी आहें. पण तुम्हीहि किती निष्ठूर आहा ? — तुमच्या त्या पत्रानं माझ्या हृदयाचे शतशः तुकडे झाले आहेत, ताई, मला जगणंहि नको वाटतं — कां मला अशी दूर ढकलतां ? —"

माझा बांध फुटला. मी गुडघ्यांत मान घालून रडूं लागलें. ताईंनी क्षणार्धांत मला आपल्याजवळ ओढली आणि घट्ट आपल्या हृदयाशीं धरली. त्यांनाहि अनिवार हुंदका आला. माझ्या डोक्यावर गाल टेकीत त्या म्हणाल्या, "उगी – बाळ – उगी !– तें पत्र मी सुद्धां रडत लिहिलं कुमुद ,– पण त्या पत्राचा तुझ्यावर एवढा आघात होईल, याची मला कल्पना आली नाही ! — क्षमा कर बाळे क्षमा कर नी आपला शोक आवर ! — रडूं नको कुमूद — रडूं नकोस !— तुझं हें रडणं मला सहन नाही होत – "

त्यांनी माझ्या गालाशीं गाल लावला! दोघींच्या गालावरून अश्रु वाहत होते आणि एकत्र होऊन खाली आमच्या जुळलेल्या हातावर पडत होते.

चंद्राची कोर पाहत होती. समुद्र हसत होता.

— समाप्त —